# इंद्रधनु

:: :: :: :: :: :: ::

लघुकथासंग्रह

लेखक



प्रभाकर तुकाजी दिघे

सोल एजंटः—नरेंद्र बुक डेपो, दादर.

१९३६

किंमत १० आणे.



प्रकाशक—

प्र. तु. दिघे,

४२, गुलसरूफ बिल्डींग,

ले. ज. रोड,

दादर.



प्रथमावृत्ति

प्रकाशन

तारीख २३-१-३६

गडकरी स्मृतिदिन

मुद्रक—

ज. मो. माहीमकर, बी. ए.

मालकः—हिंद प्रिंटिंग वर्क्स,

पारेख स्ट्रीट, गिरगांव, मुंबई.

# —: अवलोकन :—



श्री. दिघे यांचा "इंद्रधनु" कथासंग्रह वाचून पाहिला. इंद्रधनुष्यांत विविधरंग असले तरी त्यातील तीनच अधिक उठून दिसतात. त्याप्रमाणें या कथासंग्रहांतही चमत्कृतिनिष्ठ कल्पनारम्यता, दलितांविषयीं सहानुभूति आणि संवादांतील चातुरी यांचा विशेष आढळ होतो. 'ताजमहाल'पासून 'गोलघुमटा'-पर्यंत निरनिराळीं सार्थ नांवें कथांना देण्यांत आलीं आहेत. 'पुलाचा पाया' या गोष्टींतलें सत्य हृदयस्पर्शी नाहीं असें कोण म्हणेल? "प्रतिज्ञा' या रूपकात्मक गोष्टींत कल्पनांचा थोडा फार गोंधळ असला तरी ती गडकऱ्यांच्या प्रेम व मरण या सुंदर कवितेची आठवण करून देते. 'नाजुक भावना' या गोष्टीतली युक्ति कथावाङ्मयाला चिरपरिचित असूनही कंटाळवाणी वाटत नाहीं. श्री. दिघे अनेकदां गोष्टींचा विकास, स्वभाव अगर प्रसंग यांच्या ऐवजीं विषयांतून करतात असें दिसतें. ह्या पद्धतीनें नकळत रचनेला कृत्रिमपणा येतो; शिवाय कैरी कितीही मोठी झाली तरी पिकलेल्या आंब्याची सर तिला कशी येणार? लेखकाची उदयोन्मुखता अशीच असते. परंतु हें सारें लक्षांत घेऊनही या संग्रहातली 'मोत्यांचे शिंपले' ही पहिली गोष्ट वाचतांच पहिल्या घावानें अर्धी लढाई जिंकण्याची कुशलता श्री. दिघे यांच्या अंगीं आहे असेंच रसिक वाचक म्हणतील.

पुणें
१६–१–३६ } वि. स. खांडेकर

# आविष्करण

रा. प्रभाकर तुकाजी दिघे यांच्या प्रस्तुत लघुकथासंग्रहाला वास्तविक प्रस्तावनेची गरज नाहीं. आकाशांत इंद्रधनुष्याची लांबचलांब कमान पडलेली असतांना तिकडे लोकांचें लक्ष्य आपोआपच वेधतें. तें वेधण्याकरितां मेघांच्या गडगडाटाची बिलकूल आवश्यकता नसते. किंबहुना या गडगडाटामुळें इंद्रधनुष्य पाहून होणाऱ्या आनंदाचा विरसच होण्याचा संभव अधिक! इंद्र-धनुष्य पहाण्याकरितां रसिक मनुष्यानें वर पहावें, तोंच पावसाची सर यावी, किंवा त्या धनुष्यांतूनच जणूं विजेचा बाण कडाडत खालीं यावा त्यांतलाच प्रकार सदरहू प्रस्तावनेचा आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण सर्व-साधारण वाचकवर्ग लघुकथा वाचतो तो घटकाभर करमणूक व्हावी म्हणून. त्यांतील गुणदोषांची चिकित्सा करून तात्पर्यांचे धडे शिकण्याकरितां नाहीं. दिवसभर काम करून आलेला शीण घालविण्याकरितां बागेंत फिरावयास गेलें असतां तेथें जर एखादा वनस्पतिशास्त्रज्ञ प्रत्येक फुलझाडाच्या गुणधर्मासंबंधीं कितीहि विद्वत्ताप्रचुर व्याख्यान देऊं लागला तर तें कोणी ऐकून घेईल काय? प्रस्तुत लघुकथासंग्रहाची प्रस्तावना देखील त्याच कारणामुळें वाचकांना तापदायक वाटल्यास नवल नाहीं.

एखाद्या पुस्तकाला दुसऱ्याकडून प्रस्तावना लिहून घेण्याचीं जीं अनेक खरीं व खोटीं कारणें आहेत त्यांपैकीं एकहि कारण प्रस्तुत कथासंग्रहाला लागू पडण्यासारखें नाहीं. पुस्तकांत गूढगुंजन किंवा सूचकता यांचा कलात्मक कां होईना पण अतिरेक झाला असेल तर त्याच्या स्पष्टीकरणार्थ दुसऱ्याकडून प्रस्तावना लिहून घेण्याची आवश्यकता भासते. परंतु प्रस्तुत कथासंग्रहांत ज्याला स्पष्टीकरणाची आवश्यकता आहे अशी एकहि गोष्ट नाहीं. सर्व लघुकथा सहज समजतील अशा पद्धतीनेंच लिहिण्याची रा. दिघे यांनीं दक्षता बाळगिली आहे; व अगदीं स्थूलबुद्धीनें वाचणारालाहि गोष्टीचें मर्म समजावें म्हणून कांहीं गोष्टींचें तात्पर्यहि त्यांनीं गोष्ट सांगण्याच्या ओघांतच सांगून ठेविलें आहे. लघुकथांत एखादा नवीन प्रकार रूढ केला असल्यास त्याचें स्वरूप प्रस्तावनेंत समजावून देणें इष्ट असतें. परंतु अशा तऱ्हेचा एखादा नवीन प्रकार आपण रूढ करण्याचा प्रयत्न केला आहे असें उगाच सांगण्याला लागणारा अहंकार रा. दिघे यांच्या ठिकाणीं नाहीं. एखाद्या अप्रसिद्ध लेख-

कानें वाचकांसमोर पहिल्या प्रथम येण्यापूर्वी आपल्या पुस्तकाला एखाद्या प्रतिष्ठित किंवा लब्धप्रतिष्ठित साहित्यिकाची प्रस्तावना लिहून घेणें अनेक दृष्टीनें इष्ट असतें, परंतु रा. दिघे यांचें विविध स्वरूपाचें व विस्तीर्ण लिखाण पाहिलें म्हणजे त्यांना अप्रसिद्ध लेखक म्हणणें धाडसाचें होणार आहे. कारण त्यांच्या लघुकथांप्रमाणेंच त्यांचे लघुनिबंध, विनोदी लेख, शब्द-चित्रें, प्रसिद्ध व्यक्तींचीं स्वभाव-चित्रें, इत्यादि त्यांनीं केलेलें हरतऱ्हेचें लिखाण मराठींतील बहुतेक नियतकालिकांतून प्रसिद्ध झालें आहे व होत आहे. आपली नोकरी संभाळून इतकें विविध तऱ्हेचें लेखन करणारे रा. दिघे हे किती हौशी व फर्डे लेखक असले पाहिजेत याची यावरून सहज कल्पना करितां येण्यासारखी आहे. त्यांच्या बहुप्रसू व शीघ्रप्रसू लेखणीचा कोणास हेवा तर कोणास कौतुक वाटल्यावांचून राहाणार नाहीं. ऑफिसांत सात-आठ तास काम केल्यानंतर इतरांप्रमाणें आपला उरलेला वेळ आळसांत किंवा गप्पाष्टकांत न घालवितां आपल्या मगदुरीप्रमाणें तो लेखनकार्यांत व्यतीत करावा हें रा. दिघे यांस खचित भूषणावह आहे. लेखनाची खरीखुरी व अनिवार्य हौस असल्याखेरीज असली रिकामपणची कामगिरी कोणाच्याहि हातून होणार नाहीं. रा. दिघे यांचें लिखाण पाहिलें म्हणजे आजच्या तरुण लेखकवर्गास लिहिण्याचा सराव किती चांगला आहे याची कल्पना येते.

दहा-पांच गोष्टी लिहितांच त्याचा एक लघुकथासंग्रह काढणाऱ्यांनीं किंवा काढूं इच्छिणाऱ्या लेखकांनीं रा. दिघे यांचें उदाहरण आपल्या डोळ्यांसमोर ठेवण्यासारखें आहे. रा. दिघे यांच्या निरनिराळ्या नियतकालिकांतून जितक्या गोष्टी आजपर्यंत प्रसिद्ध झाल्या आहेत त्याच्या एक पंचमांशापेक्षांहि कमी गोष्टींचा प्रस्तुत कथासंग्रहांत अंतर्भाव केला आहे, हें पाहिलें म्हणजे गोष्टींची निवड करण्यांत त्यांनीं किती संयम दाखविला हें दिसून येतें.

प्रस्तुत कथा-संग्रहांत रा. दिघे यांच्या ज्या दहा गोष्टींचा अंतर्भाव करण्यांत आला आहे त्यावरून मानवी जीविताकडे पहाण्याचा त्यांचा विशिष्ट दृष्टिकोन चांगल्या रीतीनें अनुभवास येतो. जीवनकलहांत अकालींच पडावें लागल्यामुळें असो किंवा विशिष्ट मनोवृत्तीमुळें असो रा. दिघे यांच्या गोष्टींत विकारापेक्षां विचाराकडे, विलासापेक्षां विकासाकडे, उल्लूपणापेक्षां पोक्तपणाकडे, व केवळ सौंदर्यापेक्षां सहानुभूतीकडेच त्यांचा अधिक ओढा आहे असें दिसून येतें. प्रेमाच्या पांचट कथांचा व विकृत भावनांचा आविष्कार करण्याच्या पद्धतीचा

अलिकडे जो फार सुळसुळाट झाला आहे त्याचा रा. दिघे यांच्या पुस्तकांत प्रायः अभावच आढळतो. **ताजमहालाच्या** सौंदर्यानें भाळून जाण्यापेक्षां तो बांधतानां त्याच्या पायीं किती गरीबांचे बळी द्यावे लागले असतील इकडेच रा. दिघे यांचें लक्ष्य अधिक आहे हें त्यांच्या '**ताजमहाल**' या गोष्टींत आढळून येतें. आपल्या आजारी असलेल्या पत्नीला चांगला औषधोपचार करतां यावा म्हणून दगडू ताजमहाल बांधण्याचें काम सुरू होतांच आग्र्यास जातो, पण तेथून तीन दिवसांनी घरी परत येतांच त्याला आपली बायको औषधोपचाराच्या अभावीं मेलेली आढळते. शहाजहानचें मुमताजवर जेवढें प्रेम होतें त्यापेक्षां दगडूचें आपल्या बायकोवर कमी प्रेम होतें अशांतला बिलकूल प्रकार नाहीं; पण समाजांतील विषमतेनें दगडूच्या आपल्या बायकोवरील प्रेमाचें पर्यवसान वेड लागण्यांत झालें! '**पुलाचा पाया**' या गोष्टींत देखील हीच विचारसरणी निराळया तऱ्हेनें मांडलेली आहे. आगगाडी नर्मदेवरील पुलावरून जाऊं लागली म्हणजे जी शोभा दिसते ती पुष्कळ वेळ पहावयास मिळावी असें कोणास वाटणार नाहीं? आपल्या प्रियकराबरोबर सुखासमाधानांत प्रवास करणाऱ्या सुधेला तर पूल संपूच नये असें वाटतें. पण तिच्याच डब्यांत बसलेल्या एका वृद्ध स्त्रीचा मुलगा या पुलाच्या पट्टयांची ठाकठोक करीत असतां पाय घसरून मृत्युमुखांत पडलेला असल्यामुळें तोच पूल तिच्या दुःखाला मात्र कारणीभूत होतो असें दृश्य सदरहू गोष्टींत रेखाटलें आहे. '**गोलघुमट**' या गोष्टींत उदात्त व निःस्वार्थी प्रेमाकडे पहाण्याची जगाची रीत किती हीन मनोवृत्तीची निदर्शक असते तें दाखविलें आहे. '**नाजुक भावना**' ह्या गोष्टींत आपल्या मावस बहिणीवर प्रेम करूं लागलेला सुधाकर आपल्या बायकोवरहि कोणी तरी चोरून प्रेम करीत आहे अशी शंका येतांच कसा ताळयावर येतो तें मजेदार पद्धतीनें सांगितलें आहे. '**धरणीकंप**' या गोष्टींत मानवी मनाला प्रेमाचा धक्का बसल्यामुळें एखाद्याचा लुळ्या पडलेल्या पायांत एकदम नवचैतन्य कसें भरूं शकेल हें कांहींशा अपवादात्मक उदाहरणावरून सिद्ध केलें आहे. '**विचार आणि विकार**' या कथेंत फांशीची शिक्षा असावी कीं असूं नये या कांहीं वर्षांपूर्वी मासिकांतून चर्चिल्या गेलेल्या विषयाचा जरा निराळया तऱ्हेनें विचार केलेला आढळतो. प्रस्तुत गोष्टींत स्वप्नाचा मानसशास्त्राच्या दृष्टीनें चांगला उपयोग करून घेतला आहे. साधुत्वाचा आव आणून जगापुढें आपल्या सुजनत्वाचा टेंभा मिरवूं पहाणाऱ्या मनुष्याची

खरी मनोवृत्ति स्वप्नामध्यें प्रकट झाल्याचें दाखवून रा. दिघे यांनीं जागृतावस्थेंतील व सुषुप्तावस्थेंतील मनोव्यापारांमधील फरक चांगला व्यक्त करून दाखविला आहे. '**मोत्यांचे शिंपल्यां**'त सौंदर्य कोणाचा तरी जीव घेऊन कसें जन्माला येतें याची हकीगत वाचावयास मिळते. '**प्रतिज्ञा**' ह्या गोष्टींत रा. दिघे यांच्या कल्पकतेची प्रचीति येते. '**गोल घुमट**' या गोष्टीची सुरवात वाचून ज्याप्रमाणें यशवंत कवीच्या त्याच नांवाच्या कवितेची आठवण होते त्याचप्रमाणें '**प्रतिज्ञा**' गोष्टीचा शेवटचा भाग वाचून 'गोविंदाग्रजां'च्या 'प्रेम आणि मरण' ह्या कवितेची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. फरक एवढाच कीं, गोविंदाग्रजांच्या कवितेंत वृक्षावर वीज पडतांच त्याचें अंग हर्षवायूनें पुलकित होतें तर रा. दिघे यांच्या गोष्टींत त्याच्या अंगावर भीतीनें कांटा उभा राहतो. '**मोत्यांचे शिंपले,**' '**धरणीकंप**' व '**विचार आणि विकार**' या गोष्टींत निरनिराळया तंत्रांचा अवलंब केला असून तो चांगला साधला आहे. रा. दिघे यांनीं कांहीं ठिकाणीं सूचक प्रसंग मार्मिकपणें उपयोजिले आहेत पण उलट कांहीं ठिकाणीं गोष्टींचा शेवट काय होणार हें त्यांनीं सुरवातीला किंवा मध्येंच आवश्यकता नसतांना सूचित करून वाचकांची उत्सुकता नाहींशी करून टाकिली आहे. कांहीं गोष्टीं त्यांना अधिक सुटसुटीत करतां आल्या असत्या असें वाटतें !

रा. दिघे यांच्या लघुकथांचा साकल्यानें विचार करतां जी गोष्ट प्रामुख्यानें लक्ष्यांत येते ती ही कीं, आयुष्यांतील हरएक प्रसंगाकडे पहाण्याची त्यांची स्वतःची अशी एक विशिष्ट दृष्टि आहे. त्यांच्या गोष्टींत गरीब व हतभागी माणसांविषयीं जागोजाग अनुकंपा व्यक्त केलेली आढळते. सारांश आज आपल्या समाजांत जी विषमता दिसत आहे व तदनुषंगानें जे अनेक प्रश्न 'आ' करून उभे आहेत त्यांचा सामान्य, सहृदय व सत्प्रवृत्त माणसांकडून कसा विचार केला जातो हें प्रस्तुत लघुकथासंग्रहावरून चांगल्या रितीनें निदर्शनास येतें.

शेवटीं रा. दिघे यांच्या हातून उत्तरोत्तर एकाहून एक सरस कथा निर्माण होतील असा आशावाद, त्यांच्या प्रस्तुत कथासंग्रहांतील विविध गुण करावयास लावतात, हें सांगून हें आविष्करणाचें काम येथेंच पुरें करतों.

दादर
१४–१–१९३६

वि. ह. कुळकर्णी

## दृष्टीक्षेपापूर्वी—

वास्तविक " इंद्रधनु " जें दृष्टीस पडावयाचे तें वर्षाऋतुच्या प्रारंभीच; परंतु तें शिशिरऋतुमध्यें दृष्टीस पडलेलें पाहून वाचक विस्मयचकित होण्याचा संभव आहे. परंतु हल्ली मनुष्याप्रमाणें निसर्ग देखील लहरी बनत चालला आहे, तेव्हां तसा विस्मयचकित होण्याचा प्रसंग कोणावर येणार नाहीं. हल्लीं थंडीच्या दिवसामध्येंच थंडीच पडते असे नव्हे, किंवा उन्हाळ्याच्या दिवसांमध्यें उष्माच होतो असें देखील नव्हे. मग ' इंद्रधनु ' शिशिरऋतुमध्यें दृष्टीस पडलें तर त्यांत वावगें काय ? ह्या विस्मयामधून बाहेर पडल्यानंतर, " इंद्रधनुचें " निरीक्षण करतानां वाचकांना त्याच्या रंगाच्या संख्येमध्यें बराचसा फेरफार झालेला आढळून यावयाचा. केव्हांहि पाहिलें तरी ' इंद्रधनु'मध्यें रंग ' सातच ' परंतु त्याचे ' दहा ' केलेले पाहून, प्रेमळ टीकाकार व रसिक वाचक माझ्या दृष्टीचें व बुद्धीचें ' बारा ' वाजले आहेत, कीं काय अशी शंका घ्यावयास निघावयाचे ! तेव्हां त्यासंबंधीं थोडेसे स्पष्टीकरण हवेंच—कथासंग्रहाला ' इंद्रधनु ' हें जें नांव मी दिलें तें एवढ्याच करतां, कीं इंद्रधनुमध्यें जसें रंगवैचित्र्य सर्वांच्या अनुभवास येतें, तसे ह्या संग्रहांत वाचकांना रसवैचित्र्य अनुभविता यावें. शिवाय इंद्रधनुचें दृश्य जसें क्षणिक परंतु मोहक आणि कधीं कधीं सुखद किंवा समाधान देणारें असतें, तसेंच वाचकांना हा संग्रह वाचून वाटावें आणि तसें त्यांना वाटलें तर ह्या कथासंग्रहाचें सार्थक झालें असेंच मी समजेन.

आतां " इंद्रधनु " वाचकांच्या दृष्टीस पडण्यासाठीं ज्यांनीं अविरत व अमोल श्रम आणि सहाय्य केले त्यांच्यासंबंधीं थोडेसे. त्यांच्या नुसत्या नामनिर्देशानें त्यांनीं केलेल्या सहाय्याची परतफेड होणें शक्य नाहीं ह्याची मला पुरेपूर जाणीव आहे. परंतु एखाद्या पर्णकुटीकेमध्यें बादशाही पाहुणचार करतां येत नाहीं म्हणून त्या पर्णकुटीकेमध्यें कोणी कोणाचा पाहुणचार करूं नये असें थोडेच.

प्रथम हा कथासंग्रह प्रकाशित करण्यासाठीं ज्यांनीं हार्दीक सहानुभूति दाखविली आणि मला उत्तेजन देण्यासाठीं ज्यांनीं सहाय्य केले ते मुंबईचे सुप्रसिद्ध व श्रीमान् नागरीक **रा.रा. कल्याण दत्तात्रय वैद्य, जे.पी.**

ह्यांचा मी ऋणी आहे. रसिक दृष्टी आणि मराठी वाङ्मयावरील प्रेम ह्यामुळेंच त्यांनी मला असें ' मौल्यवान ' सहाय्य केलें असें म्हणावयास हरकत नाहीं.

' इंद्रधनु ' पहाण्यापूर्वी त्यामध्यें काय विशेष आहे अथवा त्यामधील रंगाची खुलावट कशी काय साधली आहे, त्याचे आविष्करण करण्यासाठीं मी महाराष्ट्राचे नामांकित आणि विद्वान टीकाकार श्री. **विठ्ठल हरी कुळकर्णी एम्. ए.** ह्यांना विनंति केली; त्यांनीं वेळांत वेळ काढून ती मान्य केली त्याबद्दल त्यांचा मी आभारी आहे. त्याचप्रमाणें ऐनवेळीं ' इंद्रधनु'चें ' अवलोकन ' करण्यासाठीं मी महाराष्ट्राचे सुविख्यात आणि आवडते लेखक श्री. **वि. स. खांडेकर** ह्यांना आमंत्रण दिलें. आपला अमूल्य वेळ खर्च करून त्यांनी ते स्वीकारलें त्याबद्दल त्यांचा मी ऋणी आहे.

पुस्तक छापलें जात असतांना ज्यांनीं मला सहाय्य आणि सूचना केल्या त्या श्री. चं. वि. बावडेकर, श्री. शं. जुन्नरकर, वि. रं. कुळकर्णी, सरोजसुहृद, द. गो. कुळकर्णी, बी. ए. (ऑनर्स) क. आ. फडणीस, डी. कॉम. (I. M. C.) के. गो. अक्षीकर, बी. ए. ( ऑनर्स ) आणि प्र. शि. वैद्य, बी. ए. प्रभृति माझ्या स्नेह्यांचा— आणि पुस्तक तयार झाल्यानंतर त्याला सुंदर पेहराव चढवून वाचकांच्या पदरांत टाकण्यासाठीं ज्यांनीं आपला अमूल्य वेळ खर्च केला ते माझे स्नेही श्री. एस्. डी. आचरेकर, ह्यांचा व हस्तलिखितासारखे कीचकट काम देखील ज्यांनी मित्रभावानें, काळजीपूर्वक आणि सुंदर प्रकारें करून दिलें ते श्री. द्वा. ग. प्रधान ह्या सर्वांचा मी आभारी आहे.

त्याचप्रमाणें छपाईचें काम सुबकपणें आणि शक्य तितक्या लवकर करून ' इंद्रधनु ' व्यवस्थित स्वरूपांत वाचकांच्या भेटीला पाठविण्यासाठीं ज्यांनीं आटोकाट प्रयत्न केला त्या हिंद प्रिंटींग वर्क्सचे मालक श्री. ज. मो. माहीमकर, बी. ए. ह्यांचेदेखील मला आभार मानलेच पाहिजेत.

शेवटीं वाचकांना अधिक वेळ तिष्ठत न ठेवतां, दृष्टीक्षेप टाकल्या नंतर ' इंद्रधनु ' समाधान देणारें ठरेल अशी आशा बाळगून हा ' दृष्टीक्षेपापूर्वी'चा पडदा मी दूर सारणेंच युक्त.

मुंबई
१८-१-१९३६.

प्र. तु. दिघे

माझे प्रेमळ मातामह

कै. गोविंद मुकुंद कुळकर्णी

ह्यांच्या पवित्र चरणीं

सादर समर्पण.

# मो चे शिं ले
# त्यां प

आज चित्राला काय लहर आली कोणास ठाऊक ? दिवाणखान्यांत शिशिर कसलें तरी यंत्र विषयक माहितीचें पुस्तक वाचीत बसला होता, तेथें ती बरेचसे कागद घेऊन आली आणि त्याच्या जवळ समोरच एक खुर्ची ओढून ती त्याला म्हणाली,

"शिशिर मी आज एक गोष्ट लिहिली आहे, ऐकतां तुम्ही ?"

"कसली बुवा ?" विशेष उत्सुकता न दाखवितां शिशिरनें विचारलें.

अजूनपर्यंतच्या साऱ्या आयुष्यक्रमांत तिला अतिशय सुंदर वाटलेल्या कादंबऱ्या वाचण्यांची, शिफारस देखील तिनें शिशिरला कधीं केली नव्हती. फार काय तिनें स्वतः लिहिलेल्या गोष्टी देखील त्याला कधीं वाचायला दिल्या नव्हत्या, कीं वाचून दाखविल्या नव्हत्या, मग आजच तिच्या मनांत हें काय आलें ह्या बद्दल शिशिरला देखील कुतूहल आणि आश्चर्य वाटून राहिलें होतें. त्यानें कसली म्हणून विचारतांच चित्रानें उत्तर दिलें.

"माझ्या जन्मकथेवर मी गोष्ट लिहिली आहे."

यावर कपाळाला आठी घालून आणि हातामधील सिगारेट फेंकून देत शिशिर म्हणाला,

"हें बघ, एकदम जन्मकथा, सत्यकथा, हास्यकथा असे जाडे जाडे शब्द बोलून मला गुदमरून टाकूं नकोस. मी पडलों एका कारखान्यांतला इंजिनिअर—! तुमच्या ह्या गोष्टी आणि कादंबऱ्या मला कांहीं समजत नाहींत तेव्हां जरा साध्या आणि सोप्या शब्दांत त्या गोष्टीची पूर्वीची हकिकत सांगितलीस तर बरं."

" बरं बरं—तसंच करतें " हंसत हंसत चित्रा म्हणाली, " बाबांच्या डायरींतील कांहीं उताऱ्यावरून मी माझ्या जन्माची गोष्ट लिहिली आहे. त्यांतला " अशोक—मी म्हणजे बाबा " आणि " कला—माझी आई! " आतां समजलं. "

" हं, आतां समजलं थोडसं, पण आणखी कोण कोण येणार आहेत तुझ्या ह्या गोष्टीमध्यें ? " थोडासा समाधानाचा सुस्कारा सोडून शिशिरनें विचारलें.

" आणखी मी... ! " चित्रानें उत्तर दिलें.

" आणखी मी नाहीं कां येणार ? " लहान मुलासारखा चेहरा करून शिशिरनें विचारलें.

" छट् ! " उत्तर मिळालें.

" बरं तर......आतां वाच तर तुझी गोष्ट " सिगारेट केसमधील एक नवी सिगारेट काढून ती पेटवीत शिशिर म्हणाला.

" हं ऐका आतां शांतपणें—गोष्ट पुरी होईपर्यंत कांहीं विचारूं नका आणि झोपूं देखील नका हं " असें म्हणत आणि आपण बसलेल्या खुर्चीवरील उशी सारखी करीत तिनें वाचावयास सुरवात केली.

## मोत्यांचे शिंपले

—हातांत एक सुबकसें गुलाबाचें फूल घेऊन व खिडकीजवळ खुर्ची ओढून घेऊन त्याचा वास घेत घेत मी एक इंग्रजी पुस्तक वाचीत बसलों होतों. संध्याकाळ झाल्यामुळें आकाश रंगी बेरंगी झालें होतें आणि सूर्य लाल-भडक होऊन पश्चिमेला मावळत होता. मधून मधून एखाद्या पक्षाचा चिंवचिं-वाट ऐकूं येत होता, नाहीं तर रस्त्यावरून जाणाऱ्या एखाद्या गुराचें हंबरणें तरी ऐकूं येत होतें. हवेमध्यें गारवा येऊन वाऱ्याच्या मंद मंद लहरी इकडून तिकडे जात येत होत्या. एकंदरीत सारें वातावरण प्रसन्न होतें आणि माझें वाचन देखील ऐन रंगामध्यें आलें होतें.

इतक्यांत कानाजवळ कांहीं तरी हुळहुळल्यासारखें वाटलें. एखादी माशी बसली असेल कानावर, ह्या कल्पनेनें तिला हांकलण्यासाठीं म्हणून पुस्तकामधून बिलकुल लक्ष न काढतां मी त्या बाजूला नुसत्या डाव्या पंजाची हालचाल केली आणि पुन्हां भरभर वाचावयास सुरवात केली. पण कांहीं वेळानें–कसलें एक दोन क्षणांनींच पुन्हां तोच प्रयोग ! पुस्तकामधून लक्ष न काढतां त्या बाजूनें मी आपल्या हाताचा पंजा हलविला. पण छे: ! ती माशी मोठी चिकट दिसली; एक दोन सेकंदांनीं पुन्हां त्याच प्रयोगाची पुनरावृत्ति झाल्यामुळें रागांत ती जागा बदलण्याच्या इराद्यानें मी खुर्चीवरून उठलों–उठलों तो देखील त्या पुस्तकामधील कांहीं ओळी वाचीत वाचीतच. इतक्यांत कुठून तरी कोणी तरी फिदीफिदी हंसल्याचा मला आवाज ऐकूं आला. पुस्तकामधील लक्ष काढून मी मागें वळून पाहिलें...तों कला तेथें उभी होती. तिच्या हाताच्या बोटामध्यें कसली तरी काडी होती आणि गालांतल्या गालांत ती सारखी हंसत होती.

आतां सारा प्रकार माझ्या ध्यानामध्यें आला. मी देखील तिच्याबरोबर हसूं लागलों. दोघांचें हंसणें पुरे झाल्यानंतर तिनें प्रश्न केला.

"वाचायला कोणकोणत्या वस्तूंची गरज असते ?"

गंभीर चेहरा करून मी उत्तर देऊं लागलों.

"पहिली मेंदू असलेल्या डोक्याची...दुसरी पुस्तकाची, तिसरी बसावयाच्या जागेची...चवथी वातावरणाची..."

"आणखी ?"

"आणखी तुझ्या सारखीची..."

"ह्यापेक्षां अधिक गरज कशाची नसते...?"

"अं...हं, अगदीं बिलकूल नसते."

"मग हें गुलाबाचं फूल आहे तें ? त्याची काय जरूरी...?"

"हं...हें होय ? ह्याचा वास घेत घेत वाचायला जरा मजा येते."

"मजा वाटते म्हणून एखाद्याचा जीव घ्यायचा ही सुलतानशाही, आहे तुमची!'

" हं...तुला ' जगदीशचंद्र बोस ' आठवले वाटतं...?"

" नाहीं तर काय ? आपल्या लोकांचं जगणं सोपं व्हावं म्हणून तो सुलतान इतर प्रांतामधील लोक जिंकून त्यांना गुलाम बनवित असतो. "

" अचाट व अगाध आहे बुवा तुझं तत्त्वज्ञान..."

" प्रतिपक्षाला उत्तर देता आलं नाहीं, कीं मूळ मुद्याला झुकांडी देऊन त्याची कुचेष्टा करीत बसणं हा शिष्टांचा रूळलेलाच मार्ग आहे."

" मग तुला म्हणायचं तरी काय आहे... ?"

" माणसानं शक्य तो कोणाचा जीव घेऊं नये, त्याचप्रमाणें कोणत्याही वस्तूचा सौंदर्यनाश करूं नये. "

" पण निसर्ग तर रात्रंदिवस, दर क्षणाला, कोणाचा तरी जीव घेत असतो आणि कोणाचा तरी सौंदर्यनाश करीत असतो. "

" निसर्ग आणि मानव ह्यामध्यें आकाश-पाताळा इतकें अंतर आहे. "

" तुझ्या ह्या म्हणण्याप्रमाणें वागलं तर जग सुरळीत चालेल कीं नाहीं, ह्याची मला शंकाच वाटते. "

आणि ह्या नंतर आमचें हें संभाषण किती वेळ लांबलें असतें कोणास ठाऊक, परंतु कलेच्या शेजारणीनें तिला देवळांत जाण्यासाठीं बोलाविलें आणि ती निमूटपणें तिच्याबरोबर गेली. ती गेल्यानंतर हातांमधील पुस्तक वाचण्याचा मी बराचसा प्रयत्न केला, परंतु आमच्या झालेल्या संभाषणाचा विषय माझ्या डोक्यांत येई आणि आपण काय वाचतों आहोंत त्याकडे आजिबात दुर्लक्ष होई. कलेच्या धर्मभोळया आणि भावनाविवश स्वभावाबद्दल एकदां मला वैषम्य वाटे तर तिचा स्वभाव तसा आहे त्याबद्दल मनाला जरा बरें वाटे. शेवटीं कंटाळून पुस्तक मी बाजूला टाकलें आणि झालेल्या संभाषणावरून कलेला काय म्हणावयाचें होतें त्याचा विचार करूं लागलों.

कांहीं दिवसानंतरची गोष्ट. शेजारपाजारचीं मुलें फटाके वाजवूं लागलीं होतीं आणि कला निरनिराळे गोड व तिखट खाण्याचे प्रकार करण्यांत गढून गेली होती. ह्यावरून दिवाळी अगदीं नजीक आलेली असावी असा मी आपल्या मनाशीं तर्क बांधून ठेवला होता.

एक दिवस बऱ्याच उशिरानें निजून उठलों. कारण नेहमींप्रमाणें रात्रीं बराच वेळ वाचित पडलों होतों आणि पहातों तों दिवाळी सुरू झालेली. मुलाबाळांची आरडा ओरड आणि फटाक्यांचा तो धूर! जराशी लाज वाटल्यामुळेंच मी केस सारखे करून खुंटीवरचा शर्ट कसातरी अडकविला आणि तोंड धुण्यासाठीं 'ब्रश' आणि 'पेस्ट' घेऊन मी खालीं विहिरीकडे वळलों तों कला आपलें नहाण आटोपून तुळशीची पूजा करण्यांत गढून गेलेली मला दिसली. तिच्या समोरून मी पुढें गेलों हें देखील तिच्या लक्षांत आलें नाहीं. तिच्या त्या देवभोळया स्वभावाला उपहासानें मी मनांतल्या मनांत हंसलों. किती तरी वेळां उघड उघड देखील त्याबद्दल मी तिची टर उडविली होती. पण कुत्र्याचें शेपूट नळींत घालून सरळ होत असतें तर किती तरी सुंदर कुत्रीं आपल्याला दिसलीं असतीं. किती तरी दिलदार माणसांचा सहवास आपल्याला लाभला असता. नुसत्या दिलदार स्वभावाचीं माणसेंच नव्हे पण सर्वांशीं आपलें पटवून घेणारीं किती तरी माणसें आपण पाहिलीं असतीं.

उगवत्या सूर्याचें किरण अंगावर पडल्यामुळें, कलेच्या गौरवर्णामुळें आणि काळया कांठाच्या शुभ्र पातळामुळें त्या देखाव्याला विशेष शोभा आली होती. आंखूड हाताचें पोलकें घातल्यामुळें तिच्या हाताचा उघडा भाग मोहक दिसत होता. सूर्य-किरण नुकत्याच मोकळया सोडलेल्या तिच्या केसांवर–हातांमधील बांगड्यांवर पडत आणि तेथून चकाकत परावर्तन पावत. ऊन लागल्यामुळें तिच्या नाकाचें टोंक आणि कान थोडेसे लाल झाले होते. हातांतील तबकामधील निरंजनाची उष्णता लागल्यामुळें तिच्या कपाळावर घर्मबिंदू आले होते आणि किरण पडल्यावर ते चकाकत होते.

# इंद्रधनु

तिचा थट्टा उडविण्याच्या इराद्यानें दांतावरून ब्रश फिरवीत मी तेथें गेलों—गुलाबाचें फूल तुळशीला वहाण्यासाठीं तिनें हात पुढें केला होता. इतक्यांत मी म्हटलें......

" कशासाठा ही तपश्चर्या... ? "

" देवाला प्रसन्न करण्यासाठीं ! " तिनें उत्तर दिलें.

" आणि देव प्रसन्न झाल्यावर काय मागणार ? "

" अशोकांना सुबुद्धि दे म्हणून. "

" म्हणजे मला कधीं दुर्बुद्धि सुचली होती ? "

" तसं नसलं तरी वेडेवांकडे विचार त्यांना फार सुचतात ना ? आणि देवाधर्माचा कांहींच विधिनिषेध ते बाळगीत नाहींत. "

" बरं......मग ? "

" ह्याबद्दल क्षमा कर म्हणून देवाची प्रार्थना करते आहे. "

" उत्तम ! ... कर हं प्रार्थना. "

असें म्हणत न कळत तिच्या हातामधील गुलाबाचें फूल मी ओढून घेतलें आणि तें नाकाला लावलें...

माझी ती कृति लक्षांत येतांच कलेनें थोडेसें दचकल्यासारखें केलें आणि म्हटलें,

" अय्या...हें काय केलंत... ?."

" काय ? " मी शांतपणें विचारलें.

" हें काय केलंत ? देवाच्या फुलाचा वास कशाला घेतलांत ? "

" त्या फुलाला मोक्ष देण्यासाठीं...... "

" वा ! देवाचं निर्माल्य बनून त्यांना मोक्ष मिळेल, कीं तुमच्या नाकांजवळ येऊन... "

" माझ्या नाकाजवळ येऊन ! "

" छान... छान कल्पना आहे तुमची. "

" कले...तुला काय वाटतं ? समज ह्या फुलांना वाचा दिली आणि त्यांना विचारलं, कीं तुम्हांला निर्माल्य व्हावंस वाटतं, कीं एखाद्या तरुणीच्या केश-कलापावर बसावसं वाटतं, कीं एखाद्या तरुणाच्या कोटाच्या बटन ' होल ' मध्यें जाऊन बसावसं वाटतं ? तर त्यांच्याकडून काय उत्तर येईल असं तुला वाटतं ?"

" कोणीही सांगेल. "

" काय ? "

" निर्माल्य व्हावंस वाटतं म्हणून सारीं फुलं सांगतील. "

" साफ चूक आहे...असं तुझ्यासारखं सांगणारीं फार थोडी फुलं मिळतील, पण बाकीचीं सारीं आम्हांला कोणत्या तरी तरुणीच्या केसावर तरी बसूं द्या, नाहींतर कोणाला तरी आमचा वास घेऊं द्या, असंच सांगतील. "

" आपल्या सौंदर्याचा असा दुरुपयोग व्हावा असं कोणत्याच सुंदर वस्तूला वाटणार नाहीं. "

" कले, मग तुझ्या समजुतीप्रमाणें साऱ्या सुंदर स्त्रियांना जोगिणी बनावं असंच वाटत असेल नाहीं ? "

" समजुतदार—सुशिक्षित—सच्छील अशा सुंदर स्त्रियांना आपला बाजार मांडला जावा असं कधींच वाटत नाहीं. "

" हं...हं बाईसाहेब—सौंदर्य जन्माला येतं तेंच कोणाचा तरी जीव घेऊन, आणि जन्माला येतांना जर त्यानें कोणाचा जीव घेतला नसला तर जन्मल्या-नंतर तें कोणाचा तरी जीव घेतं खास "

" वा ! ह्याला पुरावा ? "

" उंची रेशमी कपडे, मोठ मोठे राजेरजवाडे वापरतात. फार मऊ आणि मजेदार असतात नाहीं ते ? परंतु तें रेशमी कापड कसं तयार झालेलं असतं ठाऊक आहे ? त्याची निर्मिती करण्यासाठीं हजारो, नव्हे लाखो रेशमी किड्यांना आपलं बलिदान करावें लागलेलं असतें. आणि तेवढ्यासाठीं हजारो कामकऱ्यांना रात्रंदिवस मेहनत करावी लागलेली असते. आतां ह्या रेशमी किड्यांनीं आपलं बलिदान केलं नाहीं तर काय होईल तुला वाटतं ?."

" काय ? "

" त्या रेशमी किड्यांपासून रेशीम घेऊन त्यांना जर आम्ही ठार मारलं नाहीं, तर ते स्वताचा उपयोग करूं न देतां फुकट मरून जातील. "

" अशी एखादीच गोष्ट सांगून नियमाची सार्थकता पटत नसते. "

" बरं दुसरी गोष्ट घे......हे तुझ्या कानांमधील कुड्यांचे मोती......ह्याची जन्मकहाणी तुला ठाऊक आहे? हा एकेक मोती म्हणजे एकेक जीवाचा मारेकरी आहे. स्वाती नक्षत्र सुरूं होऊन पावसाचे थेंब खाली येऊं लागले, कीं महासागरामधील कांहीं विशिष्ट ठिकाणीं वस्ती करून राहिलेले मोत्यांचे शिंपले समुद्रतळ सोडून पृष्ठभागावर येतात. पाण्याचा थेंब घेण्यासाठीं त्यामधील जीव त्या शिंपलीचे दोन्ही भाग उघडतो. आणि स्वातीच्या पाण्याचा एक थेंब त्यामध्यें पडला, कीं दोन्ही शिंपल्या मिटून घेऊन तो जीव खाली जातो. पुढें त्या पाण्याच्या थेंबामुळें त्या शिंपल्यामधील जीवाला एक विशिष्ट रोग होतो. त्या रोगानें तो जीव मरून त्या रोगाची जी गांठ मागें रहाते तो तुझा मोती! "

" छान्, छान् बनवली आहे गोष्ट. "

" गोष्ट नव्हे ही कले! हें वस्तुस्थितीचं दिग्दर्शन आहे. आपला जीव देऊन तयार झालेली ही मोत्यासारखी सुंदर वस्तु एखाद्या तरुणीच्या मानेभोंवती खेळत रहावी असें वाटण्याऐवजीं दगडी देवाच्या मुकुटावर ती विराजमान व्हावी असं त्या शिंपल्यामधील जीवाला वाटणं कधीं तरी शक्य आहे काय ? "

" चला—झटपट तोंड धुणं उरकून चहा घ्यावयाच्या ऐवजीं काय ही बडबड लावली आहे उगीच ! "

माझ्या ह्या अचानक माऱ्यामुळें ती निरुत्तर आणि घायाळ झाली होती. अशा वेळीं प्रतिस्पर्ध्यानें पळ काढणेंच युक्त आणि त्याच युक्तीचा तिनें अवलंब केला. आपलें सारें पूजा साहित्य आटोपून घेऊन तुळशीला प्रदक्षिणा घालून तिनें स्वयंपाक घराची वाट धरली.

मग मात्र मी मनापासून दांत घासावयाला प्रारंभ केला.

ह्या, विहीरीवर घडलेल्या प्रसंगाला, बरोबर ह्या दिवाळीला वर्ष झालें. एवढ्या अवधींत आमच्या घरांत केवढ्या मोठ्या घडामोडी झाल्या. माझ्या आयुष्यांतील संक्रमणकालच होता तो. तेवढ्या अवधींत कलेनें एका सुंदर मुलीला जन्म दिला. ती मुलगी देखील तिच्या इतकी, किंबहुना तिच्याहून सुंदर आहे नुसती, **चित्रासारखी** आहे म्हणूनच मी तिचें नांव देखील "**चित्रा**" असेंच ठेवलें.

दुर्दैवानें चारसहा महिन्याच्या आंतच कलेला बाळंतरोग होऊन तिनें ह्या जगामधील आपला संसार आटोपून टाकला, आणि चित्राचा सांभाळ करण्यासाठीं तिनें मला मागें ठेवलें.

तिचा अंत झाल्यानंतर पुन्हां पुन्हां, एका दिवाळीला विहीरीवर 'मोत्याच्या शिंपल्यांच्या मी तिला सांगितलेल्या गोष्टीची मला आठवण होई. मला वाटे खरोखरच मोत्याच्या शिंपल्याप्रमाणें आपलें बलिदान करून कलेनें मोत्या सारखी सुंदर चित्रा मला दिलेली आहे.

\+ + +

"हं झाली गोष्ट आतां" कपाळावरील घाम आपल्या पदरानें पुशीत चित्रा म्हणाली, "कशी काय वाटते तुम्हांला ?"

"सुंदर—पण–" सिगारेटचा एक झुरका मारीत शिशिर म्हणाला, "पण आपल्याला एक नाहीं आवडलं. पुढें आपलं लग्न कसं झालं तें नाहीं लिहिलंस तूं ह्यांत !"

"तें केव्हां लिहायचं आणि कोणी लिहायचं ठाऊक आहे ?" चित्रानें गालांतल्या गालांत हंसत विचारलें.

"कोणी ?" शिशिरनें अधीरतेनें विचारलें.

"आपल्याला जी चित्रा, मिळेल तिनें !" चित्रानें उत्तर दिलें.



# ध र णी कं प

## बिहारमध्यें दैवी प्रकोप !

### मोंगीर जमीनदोस्त झालें— ! !

वर्तमानपत्राच्या पोस्टरवरील जाड अक्षरांतील, कंठ कोरडा करून या ओळी जगाला संदेश पोंचवित होत्या, कीं " बिहारमधील विपद्ग्रस्थांना मदत करा. " तो धक्का कितीसे सेकंद बसला असें म्हणतात ! परंतु त्याची कर्तबगारी केवढी ! अजस्र ! अमानुष— ! होत्याचें नव्हतें तर त्यानें करून टाकलेंच— परंतु पडलेल्या घरांच्या वीटांचा ढीग उभारून त्यानें नव्हत्याचें होतें करून टाकलें—शिवाय जवाहिरलाल नेहरूसारख्या लक्ष्मीपुत्राला हातांत कुदळ आणि पावडें घ्यावयास लाविलें. त्या धक्क्यानें मोंगीर रसातळाला नेऊन पोचविलें. हजारों माणसें प्राणास मुकलीं आणि दुखावलीं गेलीं. जनावरें किती दडपलीं गेलीं त्याचा तर पत्ताच नाहीं; हो—गिन्या आणि रुपयेच जेथें चोरीला गेले तेथें दिडक्या आणि आणेल्यांची कोण मोजदाद करणार ? जो तो म्हणे " काय हा निसर्गाचा पराक्रम— ? " परदेशांत ती बातमी पोंचतांच तिकडे देखील थोडीशी धांवपळ झालीच. संकटपतीतांसाठीं निरनिराळे फंडही उभारण्यांत आले.

पृथ्वीच्या पोटांत थोडीशी गडबड झाली पण त्यामुळें भूपृष्ठावर केवढी दाणादाण उडाली !

हा एकंदर प्रकार पाहून माझ्या मनांत एक निराळाच विचार आला.

मानवी मनाला असाच धक्का बसून त्यामुळें मनुष्याच्या बाह्य अवयवांत फरक पडूं शकेल काय ? किंवा त्यामुळें निरुपयोगी अवयव उपयोगी होऊं शकतील काय ? तसा तो बसला तर तो कोणत्या प्रकारचा असूं शकेल आणि तो कोणत्या परिस्थितींत बसला तर यशस्वी होईल ?

असाच एक दिवस मी शेजारच्या सुरेन्द्राबरोबर गप्पा मारीत बसलों होतों. सुरेंन्द्राचें, सुधा हें " दुसरें कुटुंब " होतें इतकेंच मला माहीत होतें. गप्पा मारतां मारतां पुढें विषय आला " वैवाहिक जीवन. " मी माझा प्रश्न तसाच त्याच्यापुढें केला. तो म्हणाला " थांब हं, " त्या प्रश्नाचें उत्तर आमच्या दोघांचा अनुभवच देईल " आणि तेथून उठून तो लागलाच आपल्या खोलींत गेला. मी विचार करीत होतों, कीं " अनपेक्षितपणें उद्भवलेल्या माझ्या ह्या प्रश्नाला असें अनपेक्षितपणेंच उत्तर मिळणार काय ? " इतक्यांत सुरेन्द्र दोन दैनंदिनी घेऊन माझ्यापुढें उभा राहिला; त्यांपैकीं एक त्यानें स्वता लिहिलेली होती. " ह्या तांबड्या पेन्सीलीच्या खुणा केलेल्या आहेतना ? तेवढ्याच तारखा वाचून काढ "सुरेन्द्रानें मला सांगितलें आणि तो घरांत जाऊन बसला. " हें सारं वाचल्यावर तुझ्या प्रश्नाचें उत्तर तुला मिळालें, कीं नाहीं तें जरूर सांग हं. " जातांना त्यानें मला बजावलें. मी त्यामधील पानें चाळूं लागलों.

* * *

२९ एप्रिल १९२५

समुद्र किनाऱ्याला लागून अगदीं मुंबई जवळच हा गांव आहे खरा. परंतु माझ्या एकटीचा वेळ येथें कसा जाणार हेंच मला एक कोडें पडलें आहे. दादा बरोबर आला असता-तर ! परंतु तो तरी कसा येणार ? त्याला ते क्लासेस घ्यायचे आहेत ना ? बाबानीं हवा बदलण्यासाठीं जागा तर मोठी छान निवडली आहे. अप-टु-डेट बंगला व सभोंवार सुंदर बगीचा —कंटाळा आला तर तेथें तरी जाऊन बसायला जागा आहे. परंतु तेथें तरी किती वेळ जाऊन बसणार ? फुलांची आणि फुलझाडांची मला आवड आहे, कबुल; पण एखाद्या मनुष्यानें सांगितलें, कीं " मला श्रीखंड आवडतें " आणि रोज जर तेंच त्याला कोणी खावयास दिलें तर ? आवडीला देखील सीमा असतेच. बरं गांवांत दुसरीकडे कुठें फिरायला जायाचें म्हटलें तर गांवांत

दुसरें कोणी ओळखीचें नाहीं. मग फिरायला जाणें एवढेंच काय तें शक्य. संध्याकाळ झाली, कीं बाबा, आई व मी तिघेही समुद्रावर फेरी मारायला निघतों हाच आमचा रोजचा कार्यक्रम.

* * *

२ मे १९२५

गांवांत कांहीं विशेष घडलें, कीं त्याचीच चर्चा करावयाची त्यांतच मनोरंजन करून घ्यावयाचे असेच दिवस चालले आहेत.

समोरच्या बंगल्यांत आमचा घर मालक तो पारशी गृहस्थ रहात आहे. मनानें मोठा उदार व सरळ गृहस्थ दिसतो आहे तो. आपल्या बंगल्याच्याच पिछाडीला त्यानें गुलाबांची एक वाडीच्या वाडी उठविली आहे. त्याच्या पत्नीशीं देखील मी ओळख केलेली आहे. साहजिकच गड्याबरोबर ती सकाळच्या प्रहरीं मला गुलाबाचीं फुलं पाठविते. आज बरेच दिवस त्यांच्या बंगल्याचा खालील भाग रिकामा होता, तो भाड्यानें देण्याचा त्यांचा विचार होता. आज सकाळीं मी उठलें आणि पहातें तों, त्या खालच्या भागाचीं दारं आणि खिडक्या सारीं उघडलेलीं. त्या मालकाचा गडी सर्व झाडलोट करीत होता. मला जरा बरें वाटलें. कारण मला नवें शेजार प्राप्त होण्याचीं हीं सुचिन्हें होतीं. आज दुपारीं ह्याची चौकशी करीन, असा सकाळींच विचार केला आणि त्या प्रमाणें दुपारीं विचारपूस करण्याकरितां गेलें. तों तेथें कळलें, कीं तो भाग एका दाक्षिणी गृहस्थानें भाड्यानें घेतला आहे. मी तेवढ्यावरच समाधान मानलें, कीं मला गप्पा मारायला एक दाक्षिणी बाई मिळणार– !

× × ×

४ मे १९२५

माझ्या मनाला मोठी आशा होती—परंतु आशा ही एक प्रकारची मदिरा आहे. तिच्यामुळें तिच्या मागें लागून आपण शक्याशक्यता—इष्टानिष्टता ह्याकडे कधींच लक्ष देत नाहीं. त्या दिवशीं आमच्या समोरचा तो भाग एका

दक्षिणी गृहस्थानें घेतला आहे असं कळल्यावर, मला अशी आशा होती, कीं मला शेजारीण मिळेल. परंतु आज माझी ती आशा अगदींच फोल ठरली आहे. कारण तो दाक्षिणी, एक सडा फटींग आहे—बायका पोरांचे शेपूट तर त्याच्या मागें मुळींच नाहीं. गृहस्थ दिसावयास तर मोठा हुषार व रुबाबदार दिसत आहे. चांगल्यापैकीं " स्पोर्टस्मन " असेल असें मला वाटत आहे. त्याचा तो चेहरा व वागण्याची पद्धत मोठी आकर्षक आहे.

आजचा सारा दिवस तो कोण असेल हा विचार करण्यांत मी घालविला.

* * *

६ मे १९२५.

आज मोठीच गंमत झाली. मी सकाळीं साधारण दहाच्या सुमारास आमच्या घरमालकीणीकडे समोर बसावयास गेलें होतें. तिच्याजवळ मी थोड्याशा गप्पा मारल्या. गुर्जर मराठीच भाषा होती ती. तिला एका गुलाबाला कलम बांधावयाचें होतें म्हणून ती वाडींत जाण्यांसाठीं खालीं उतरली. मी देखील तिच्या बरोबर खालीं उतरलें तेव्हां पहातें तों, तो नवा गृहस्थ मागच्या दारांतून माझ्याकडे टक लावून पहात होता. मला जरा लाजच वाटली येतांना. मी त्याच्या हातांतील पुस्तकाकडे चोरटी नजर टाकली तो तें वुडहैासचें " डॉ. सॅली " होतें. वा ! माझ्या प्रमाणें हाही गृहस्थ " वुडहैासचा " भोक्ता आहे तर—मला वाटलें ! तो गृहस्थ माझ्याकडे पहात होता याबद्दल मला चुटपुट लागली.

* * *

८ मे १९२५

बाबांच्या सांगण्यावरून मला कळलें, कीं तो गृहस्थ मुंबईचा एक उत्तम पैकीं ' क्रीकेटिअर् ' आहे व त्याची प्रथम पत्नी वारली असल्यामुळें तो हल्लीं विधूर आहे. शिवाय आज बाबानीं मला सांगितलं " सुधे तुला जर त्या सुरेन्द्राकडे पुस्तक मागावसं वाटलं तर मागत जा—बरं. " म्हणून मी सुरेन्द्रा-

कडून एक पुस्तक देखील वाचावयास आणलें आहे. परंतु ह्या सुरेन्द्राविषयीं मला एक आश्चर्य वाटतें, कीं हा गृहस्थ कधीं फिरायला वगैरे कसा बाहेर पडत नाहीं? आणि त्यामुळें तर मला त्याच्या विषयीं जास्तच उत्सुकता वाटूं लागली आहे.

*          *          *

१० मे १९२५

आज दुपारीं समोरच्या सुरेन्द्राकडे मी गप्पा मारीत बसले होते तेव्हां मला कळलें, कीं सुरेन्द्र सहसा कधींच बाहेर पडत नसे. त्याचें कारण त्याच्या हातापायांत शक्ति नसल्यामुळें चालतांना त्याला कुबडी घ्यावी लागते व त्याचीच त्याला लाज वाटते. आणि अशी कुबडी घेण्याची वेळ येण्याचें कारण त्याचें घोड्यावर बसणें. स्पोर्टस्‌मनशीपचा अतिरेक. एकदां घोड्यावरून स्वारी खालीं कोसळली व तेव्हांपासून राजश्री असे उसन्या पायांचे बनले. मला अलिकडे त्याच्या विषयीं कांहीं निराळाच आपलेपणा कां वाटूं लागला आहे कोणास ठाऊक–? त्याच्याविषयीं मला कांहीं तरी निराळेंच वाटूं लागलें आहे खास ! तें " निराळेंच " काय निघणार आहे कुणास ठाऊक ?

\+          \+          \+

सुधेच्या दैनंदिनीमधील खुणा केलेल्या सर्व तारखा येथेंच संपल्या म्हणून मी ती सुधेची दैनंदिनी खालीं ठेवली व नंतर सुरेन्द्रानें स्वतः लिहिलेली दैनंदिनी उघडून वाचूं लागलों—

१५ मे १९२५

आज सकाळपासून मी आपल्या मनाशीं विचार करीत होतों; आतां ह्या स्थितींत जर मला वैवाहिक आयुष्य उपभोगण्याची इच्छा झाली तर ती पूर्ण होऊं शकेल काय ? परंतु नंतर मी स्वताच्या परिस्थितीचें निरिक्षण केलें, कीं माझें मलाच वाटूं लागे, माझ्यासारख्या संसार मोडून बसलेल्या व हातपाय असून नसल्यासारख्या बैराग्याबरोबर स्वताचें सर्व आयुष्य काढावयास कोणती स्त्री तयार होणार ? पण–पण–ह्याच्या मागोमाग एक सुंदर कल्पना माझ्या डोळ्यांपुढें उभी राही. कदाचित् ती कल्पना पापी देखील असूं शकेल.

" सुधा आपलं सारं आयुष्य माझ्याबरोबर काढावयास तयार झाली तर ? "

परंतु हें घडणार कसें ? पण पुन्हां सुधेची एकंदर वागणूक लक्षांत घेतली, कीं असें घडून यावयास तिची हरकत नाहीं असें माझें मलाच वाटतें. अभ्रांनीं आच्छादिलेल्या आयुष्याच्या आकाशांत हीच एक तारका चकाकत आहे अशी आज माझी खात्री झाली आहे.

\+ + +

२० मे १९२५

माझ्या आयुष्यांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवावी अशी क्रांति काल घडून आली. माझी खात्री आहे, अशी क्रांति माझ्या आयुष्यांतच प्रथम घडून आली आहे. जी गोष्ट आज मोठमोठ्या संशोधक डॉक्टरांना असाध्य होऊन बसली आहे ती गोष्ट, कालच्या एकाच प्रसंगानें कशी शक्य झाली ह्याचें माझें मलाच आश्चर्य वाटतें ! सुधेवरील माझ्या निस्सीम प्रेमामुळेंच मी चांगला धडधाकड नवजवान झालों आहे हें अगदीं निश्चित. प्रेम ही एक दिव्य चीज आहे ह्याची मला काल प्रचिती आली. काल रात्रींचा कोण तो भयंकर प्रसंग ! मी जर तें धाडस केलें नसतें तर जन्मभर मी लंगडा व थोटाच राहिलों असतो. काल सकाळपासून थंडी म्हणजे कोण पडली होती ! जो तो स्वतःला " गरम " कपड्यांत गुंडाळून घेत होता. रात्रीं देखील बरीच थंडी वाजत होती म्हणून सुधेच्या बंगल्याच्या माळ्यानें तेवढ्या रात्रीं शेगोटी पेटविली व तेथें तो स्वतःला " गरम " करीत बसला. भोळा बिचारा ! पुढील प्रसंगाची त्याला काय कल्पना ? सुधेच्या बंगल्यामागें गवताचा सांठा होता त्यांत आगीची एक ठिणगी जाऊन पडली. क्षणार्धांत आग त्या बाजूकडून बंगल्याला चाटूं लागली—गोंजारूं लागली. व सुधा देखील त्याच बाजूच्या खोलींत निजली होती. तिचे आई व बाबा पुढच्या भागांत निजले होते. आग लागली असें कळतांच खूप आरडा ओरड त्यांनीं करावयास सुरवात केली. ती दोघे देखील खाली उतरेनात—बरं, सुधेची खोली तर अगदीं एका टोकाला—कोणी तिला त्यांतून सोडवून आणा-

वयास धजत नव्हतें. मला काय वाटलें कोणास ठाऊक ? लुळापांगळा मी, त्या आगींत तसाच चालत गेलों व त्या आगींतून स्वताच्या हातावर सुधेला बाहेर आणली–पण तेव्हां पासून माझे हात व पाय कसे बरोबर काम बजावूं लागले आहेत. हा सारा कशाचा परिणाम? हें इतरेजनांना समजणें अतिशयच कठीण आहे.

\+ + +

येथेंच ती तारीख संपली व सुरेन्द्रानें मला वाचावयास आणून दिलेलें लिखाण देखील संपलें. इतक्यांत सुरेन्द्र आपल्या खोलींतून बाहेर आला व मला ह्मणाला " काय प्रभा, वाचलेस सर्व ? थांब आतां ह्याची पुढची हकीकत मीच तुला सांगतों " सुरेंद्रानें ती दैनंदिनीचीं पानें गोळा केलीं व तो सांगू लागला—

" ह्या नंतर आमचे दोघांचे वागणें पाहून सुधेच्या वडिलांनीं व मातोश्रीनी आमचा दोघांचा सूज्ञपणें विवाह लावून टाकला—इतकेंच ! पण कां ? आहे कीं नाहीं, हें तुझ्या प्रश्नाचें उत्तर ? आहे कीं नाहीं माझ्या आयुष्यांत एक मोठा थोरला धरणीकंप ? "

" होय ! "

त्यावेळचा लुळापांगळा सुरेन्द्र आतां माझ्या सारख्या चौघांना भारी बनलेला पाहून मी ' नाहीं ' असें तरी कसें ह्मणूं ?



# विचार आणि विकार

"आणि त्या मनुष्याच्या हातून खून घडला ह्मणून त्याला फांशीची शिक्षा देऊन ह्मणजेच त्याचा अप्रत्यक्ष रीतीनें खून करून आपण तरी काय साधणार आहों? त्यामुळें मारला गेलेला मनुष्य थोडाच परत येणार आहे? भावनेच्या भरांत ह्मणा, अगर दुसऱ्या कांहीं कारणानें ह्मणा, त्याच्या हातून खून घडला हें खरें; परंतु त्याला फांशीची शिक्षा देऊन आपण त्याच्या वर्तणुकीमध्यें सुधारणा थोडीच घडवीत आहोंत? तेव्हां फांशीच्या शिक्षेपेक्षां खुनी माणसाला त्याचें वर्तन सुधारेल, त्याला केलेल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप होईल अशीच शिक्षा देणें योग्य नव्हे का? माझें तर असें ठाम मत आहे, कीं फांशीची शिक्षा ही रद्द झालीच पाहिजे!"

श्रोत्यांवर माझीं मतें लादण्याचा मी शक्य तों प्रयत्न करीत होतों. माझ्या वक्तृत्वपूर्ण भाषणानें मी त्यांना दिपवूनच टाकलें होतें.

तो शनिवार होता. त्या दिवशीं संध्याकाळीं सहा वाजतां माझें 'जवाहिर हॉल' मध्यें लोकसेवा संस्थेतर्फे 'फांशीची शिक्षा रद्द करावीं कीं करूं नये?' ह्या विषयावर व्याख्यान होतें. त्यावेळीं फांशीची शिक्षा रद्द करावी हें मत सर्वत्र बोकाळलें होतें. त्या मताला विरोध करणारे फारच थोडे लोक होते. मोठमोठे विद्वान लेखक व वक्ते तर फांशीची शिक्षा रद्द करावी ह्याच मताचे होते. त्यामुळें लोकांची ह्या विषयावरील व्याख्यानाला विशेष गर्दी होत असे. माझेंहि व्याख्यान त्याच विषयावर असल्या कारणानें, एखाद्या कसलेल्या लेखकाच्या किंवा मुरलेल्या वर्तमानपत्राच्या रिपोर्टराच्या भाषेंत सांगावयाचे तर, माझ्या व्याख्यानाला "श्रोत्यांचा सागरच उसळला होता."

हॉल भरगच्च असल्यामुळें मलाहि स्फुरण चढलें होतें.

सभेचे अध्यक्षही माझ्याच मताचे होते. दीड–दोन तासांतच मी माझें व्याख्यान संपविलें. आभार–समारंभ वगैरे झाला व लोक घरोघर निघून जाऊं

लागले. रस्त्यावर जो तो माझ्या व्याख्यानाची तारीफ करीत होता. त्या त्यांच्या स्तुतीमुळें, प्रामाणिकपणें सांगावयाचे तर, माझ्या अंगावर मूठ-मूठ मांस चढत होतें.

थोड्याच वेळांत हॉल रिकामा झाला व मी लोकसेवा संस्थेच्या चिटणिसां-बरोबर घरीं आलों.

*   ※   *

माझा धाकटा बंधु वसंत घरीं असेलच असा विचार करून मधुकर, माझा जानीदोस्त, माझ्या घरीं व्याख्यान वगैरे ऐकून आला होता, व दरवाजाकडे पाठ असलेल्या एका आरामखुर्चीवर तो पंख्यानें वारा घेत होता.

त्याच्या स्वभावानुसार माझ्या व्याखानाचें त्याच्यासमोर पृथःकरण होणार हें मी जाणूनच होतों. माझी चाहूल लागतांच त्याचें लक्ष दरवाजाकडे गेलें. —तात्काळ त्याच्या थट्टेला भरती आलीच.

" यावं, व्याख्याते ! म्हटलं नवविचारप्रवर्तक समाज–सुधारक जयंत-महाराज कीं जय ! " मधुकर माझ्याकडे पाहून म्हणाला. मी त्याच्या थट्टेला ओहोटी आणण्याकरतां त्याच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष न देतां कपडे ठेव-ण्याच्या खोलींत गेलों. हार एका खुंटीला टांगून ठेवला, पुष्पगुच्छ एका बॅग-वर टाकला, कपडे बदलले व नळावर जाऊन तोंड वगैरे धुवून तें पुसण्याक-रतां परत त्या कपडे ठेवण्याच्या खोलींत गेलों. बॅगवरचा पुष्पगुच्छ माझ्या दृष्टीस पडला, तात्काळ माझ्या सुपीक डोक्यांत, पुष्पगुच्छ दृष्टीस पडण्याचें खत पडून मधुकराची थोडीशी थट्टा करण्याचें पीक उगवलेंच. टॉवेलनें हात–पाय व तोंड पुसलें, आणि त्या पुष्पगुच्छांतील गुलाबाचें फूल मीं काढून घेऊन बाकीचा पुष्पगुच्छ मधुकरासमोर धरून मी बोलूं लागलों—

" आमचे सन्मान्य श्रोते श्रीयुत मधुकरराव ह्यांनीं माझें भाषण शांतपणें म्हणजेच भाषणांमध्यें कोणत्याही तऱ्हेचा व्यत्यय न आणतां ऐकलें, त्या बद्दल मी त्यांचे मन:पूर्वक आभार मानतों; व मी माझ्या स्वत:तर्फे हा फूल

ना फुलाची पाकळी, नव्हे हा फूल ना फुलाचा गुच्छ मी त्यांना देणगी म्हणून अर्पण करतों. त्याचा ते स्वीकार करतील अशी आशा आहे."

माझी बाजू माझ्यावर उलटविण्याकरितां मधुकर शान्तपणें बोलूं लागला, "आजचे सन्मान्य वक्ते जयंत ह्यांनीं आमचे आभार मानले त्याबद्दल तीव्र निषेध प्रदर्शित करून त्यांनीं अर्पण केलेली त्यांची देणगी त्यांना आम्ही साभार परत करतों" असें म्हणून मधुकरानें पुष्पगुच्छ माझ्या अंगावर फेंकला.

ह्या थट्टेची इतिश्री करण्याकरतां मी गंभीरतेनें त्याला म्हणालों,

"मधु, तुझ्या थट्टापुराणाची जरा वेळ समाप्ति कर हं! मी तुला खरोखरच विचारतो, कीं तुझं ह्या विषयाविषयीं काय मत आहे ?"

"जयंत, ह्या बड्या विषयावर मत द्यायला मी तुझ्या सारखा जाडा विद्वान थोडाच आहे?" मधु मला चिडविण्याच्या हेतूनें म्हणाला.

"तसं नव्हे रे, पण मी आपलं तुला सहज विचारतों," मी त्या गुलाबाच्या फुलाचा वास घेत म्हटलें.

"जयंत, आमच्यासारख्या सामान्य माणसांना तुम्हां विद्वानांसारखीं ठाम मतें वगैरे कांहीं नसतात हं! आम्ही काय, 'गतानुगतिक' लोकांच्या ओघाबरोबर जाणार." मधु म्हणाला.

"बरं! पण मधु, तुझं मत तुला सांगयच नसलं तरी माझं व्याख्यान कसं झालं हें तरी सांगशील?" मी म्हणालों.

"वा! तुझ्या व्याख्यानासंबंधीं काय सांगायचं! तुझं व्याख्यान तर एखाद्या मुरलेल्या वक्त्यालासुद्धां मान खालीं घालायला लावील! काय ते तुझे नवे विचार? काय तीं तुझीं मतं? बोलूंच नको! व्याख्यानांत दोष तर कोणालाच काढतां येणार नाहींत. परंतु जयंत, मला, कांहीं कारण सांगता येत नाहीं, पण असं मात्र वाटतं, कीं फांशीची शिक्षा रद्द करून आपलं मुळींच चालणार नाहीं. तो कायदा आवश्यक आहे."

नाहीं-नाहीं म्हणतां म्हणतां, मधुकराचें स्वतःचें मत त्याच्याच तोंडून बाहेर पडलें.

"वा! मधु, खरोखरच शंकरापुढचा दिसतोस बुवा मला तूं! अरे, मोठे मोठे विद्वान तो कायदा रद्द केला पाहिजे, म्हणून ठासून सांगत आहेत. तो कायदा रद्द केला पाहिजे म्हणून सर्व जग म्हणत आहे, परंतु तुझं आपलं जगावेगळंच. मनुष्यानं मनुष्याला फांशीची शिक्षा देणं म्हणजे सुधारलेल्या मानवजातीनं आपणांत थोडातरी आपल्या पूर्वजांचा गुण-जंगलीपणा आहे, हें सिद्ध करणं असंच नव्हे का?" मी मधूला मूर्ख ठरवूनच म्हटलें.

"अहो, तें तुमचं तत्वज्ञान मला नको आहे. मी आपलं प्रामाणिक मत तुला सांगितलं, ह्यांत माझा कांहीं गुन्हा आहे का?" मधू आरामखुर्चीवरून उठत म्हणाला.

त्यानें कोट चढाविला, समोर आरशांत पाहून केंस सारखे केले व टोपी चढविली. दारांत जाऊन चप्पल घालीत असतांना मुक्यानें जाणें बरें नव्हे म्हणूनच, कीं काय तो मला म्हणाला,

"बरं आहे, व्याख्याते. म्हटलं आतां आम्ही उद्यां पर्यंत आपली रजा घेतों."

तो गेलेला पाहून मी सुद्धां भोजनाकरितां खुर्चीवरून उठलों. फूल टेबलावर फेकलें व भोजनाच्या खोलींत गेलों.

आम्हां दोघांना, मला व मधुकराला एकत्र पाहून, वसंतानें दूरदर्शीपणानें आपलें भोजन अगोदरच उरकून घेतलें होतें. तेव्हां मला स्वतःलाच वाढून घेण्याची पाळी आली.

मी भोजन उरकलें व थोडीशी मसाल्याची सुपारी तोंडांत टाकून पंधरा वीस मिनिटें शतपावली केली; व नुकताच प्रसिद्ध झालेला 'कमला' मासिकाचा अंक हातांत घेऊन, दिवा बिछान्याजवळच्या एका चुकेला लावून तो मोठा केला, व बिछान्यावर पडलों.

* * *

संध्याकाळीं साडेसहाचा तो सुमार असेल. मी ऑफिसमधून घरीं आलों तों वसंता आपला अभ्यास संपवून, मी त्याला चौपाटीवर नेणार म्हणून गॅलेरींत माझी वाट पहात उभा होताच—मी कपडे काढले व नळावर जाऊन तोंड वगैरे धुवून परत आलों तोंपर्यंत वसंत कपडे घालून सज्ज झाला होताच. केस सारखे केले, टोपी कशी तरी डोक्यावर ठेविली, आरशाकडे एकवार नजर फिरविली व दार ओढून घेऊन कुलुप लावलें, आणि चौपाटीची सफर करण्याकरितां चाळीबाहेर पडलों. क्वीन्सरोडवरून चर्नीरोड स्टेशनच्या बाजूनें मी व वसंत फुटपाथवरून मार्ग आक्रमूं लागलों.

अगोदर क्वीन्सरोड; त्यांत सायंकाळची वेळ. मग त्या रस्त्याला वाहनांची किती गर्दी असणार हें सांगावयास नकोच.

फुटपाथवरून जातांना—

" दादा, मास्तर म्हणत होते, कीं खरं पाहिलं असतां देव एकच आहे; मग काय रे दादा, आपण काय खोटंच पहातों ? आणि म्हणूनच कां रे आपण इतक्या पुष्कळशा देवांची पूजा करतों ?

मराठी दुसरी शिकत असलेला वसंता मला एकाद्या वेदांत्याच्या अभिनिवेशांत प्रश्न विचारीत होता.

ह्या त्याच्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें ह्या विचारांत मी पडलों.

इतक्यांत काय झालें कोणास माहित. परंतु " पों पों " करीत एक 'सेव्हन सीटर्स फिआट' फुटपाथवर येऊन आदळली व तिनें वसंताला धक्का दिला.

वसंताला धक्का बसल्याचें पहातांच माझ्या छातींतील ठोक्यांची गती वाढूं लागली.

ती मोटार एका श्रीमंत व्यापाऱ्याची होती. तो श्रीमंत गृहस्थ क्वीन्सरोड-सारख्या ठिकाणीं नुकतांच मोटार हांकण्यास शिकत होता.

छातींत बसलेल्या धक्क्यामुळें वसंता चार पांच फुटांवर फेंकला गेला मी त्याच्याजवळ गेलों तों, तो रक्तानें न्हाऊन निघाला होता. मला वाटलें,

कीं त्याला जरा जास्त जखम झाली असेल एवढेंच. आतां ताबडतोब हॉस्पिटलांत नेलें, कीं पडूं लागेल त्याला आराम.

परंतु माझ्या दुर्दैवानें हिमालयाचें एव्हरेस्ट शिखरच गांठलें होतें. माझा लाडका वसंता मला कांहीं एक न सांगतां त्या "एकाच देवाकडे" निघून गेला होता !

वसन्त–वसन्तावर माझें अतिशय प्रेम होतें. लहानपणापासून त्याला कोणी लागून बोललें, कीं मला दुःख होत असे. तो ज्याच्याशीं बोलत नसे त्याच्याशीं मीहि बोलत नसे. वसंताला शिकण्याकरितां व मला नोकरीकरितां आमच्या मातापित्यांनीं आम्हांला कोंकण सोडणें भाग पाडलें होतें. त्यामुळें वसन्ताच्या सुखदुःखाची सर्व जबाबदारी माझ्यावर पडली होती. आणि वसन्ताची ही स्थिति पाहून मला माझे आई वडील काय म्हणतील हा विचार माझ्या मनांत येतांच, माझ्याहि अंगावरून अशीच एखादी मोटार येऊन जाईल तर फार बरें होईल असें मला वाटूं लागलें. अजूनपर्यंत त्याच्या सुखदुःखाकडे पूर्ण लक्ष देणें हें मी माझें ध्येय ठरविलें होतें.

जो लहानपणापासूनच माझ्यावर अतिशय प्रेम दाखवीत असे, तो वसन्त त्या श्रीमंत नरराक्षसाकडून–मोटारखालीं कां होईना–मारला गेलेला पहातांच, माझ्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन पोंचलीच होती; आणि आतां थोडक्याच वेळांत ती तेथून बाहेर पडेल असें मला वाटत होतें. त्यावेळेस माझी मलाच शुद्ध नव्हती.

ते वसन्ताचे उघडे असलेले डोळे, जणुं काय मला बजावीत होते कीं—

"दाश तुझ्या वसन्ताकरितां तूं एवढे हाल काढलेस, त्याच्या मनाला कसलाच धक्का बसूं नये म्हणून तूं आटोकाट प्रयत्न केलेस, त्या तुझ्या वसन्ताला आतां प्रत्यक्ष बेजबाबदार माणसाच्या मोटारीचा धक्का बसला असतांना, एखाद्या अबलेसारखा हुंदका देत काय बसतोस ? ह्या वेळेला तुझें कर्तव्य काय—हें तुला कळत नाहीं ? आईला व बाबांना तूं काय सांगणार ?

तूं ह्याचा सूड न घेतां नामर्द म्हणून जगाकडून निंदिला जाणार ? तूं सूड न घेतां स्वस्थ बसणार ? आणि आपल्या निष्कलंक आयुष्याला तो कलंक लावून घेणार ? त्यापेक्षां एकादी अबला कां झाला नाहींस ? तर काय, तूं 'मी वसन्तावर माझ्या प्राणापेक्षांहि अधिक प्रेम करतों' असं म्हणून लोकांना फसवीत होतास !"

ह्या वसंताच्या उघड्या डोळ्यांनीं सूचित केलेल्या प्रश्नाला मी काय उत्तर देणार ?

एकानें गाय मारली म्हणून दुसऱ्यानें वासरूं मारावयाचें कां ?

एखाद्या मनुष्यानें खून केला म्हणून त्या खुनी मनुष्याचा 'सूड' म्हणून दुसऱ्यानें खून करूं नये, ह्या मताच्या मीं, त्या वेळेस काय केलें ? दुःखातिरेकामुळें मी पूर्ण आंधळा बनलों होतों—मला कशाचेंही भान नव्हतें.

रस्त्याच्या दुरुस्तीकरितां आणण्यांत आलेल्या दगडांपैकीं एक मोठासा, म्हणजे कोणाच्याही डोक्यांत मारल्यावर तो लवकरच स्वर्गद्वारीं जाईल—अशा बेताचा दगड घेऊन मीं मागचा पुढचा किंवा स्वतःचा सुद्धां विचार न करतां तो धोंडा त्या श्रीमंताच्या डोक्यांत घातला !

तो श्रीमंत गृहस्थ वसंताला हॉस्पिटलमध्यें नेण्याची तयारी करीत होता; परंतु मी त्याच्यावर असा अचानक हल्ला चढविल्यामुळें तो श्वास बंद पडून जमिनीवर आकाशाकडे डोळे लावून बसला. त्याचा आत्मा कोणत्या तरी दूर प्रदेशांत प्रवास करीत होता.

परंतु पुढें काय ?

डोक्यांत पुढच्या विचारांचें चक्र सुरू होतांच, माझ्या डोळ्यांपुढें काजवे चमकूं लागले. ह्या वेळ पावेतों लोकांची गर्दी आमच्या भोंवतीं चांगलीच जमली होती. दोनचार पोलीसही त्या ठिकाणीं हजर झाले होते. तेव्हां खून करून त्या ठिकाणाहून पळतां येणेंहि मला अशक्य होतें. काय घडतें तें पहावयाचें असा मीं निश्चय केला.

द्र ध
इं २४ नु

त्या पोलिसांनीं अधिक विचारपूस न करितां मला चतुर्भुज केलें, श्रीमंत गृहस्थाला, वसंताच्या देहाला व मला मोटारींत बसविलें व मोटार पोलिस-स्टेशनकडे नेण्यास हुकूम फर्माविला.

आतां पुढें काय होणार ?

परंतु माझ्या डोक्यानें मुळींच विचार न करण्याचा सत्याग्रह आरंभिला.

माझे पाय लटपट कापूं लागले, अंग गार पडूं लागलें, कान बधिर झाले.

× × ×

परंतु त्या बधिर कानांनीं सकाळच्या पांचचा घड्याळाचा अलार्म ऐकण्याचें काम केलेंच ? व मी डोळे उघडून ते चोळीत पहातों, तों काय ? माझ्या हातांत पोलिसांनीं घातलेलीं तीं लोहभूषणेंहि नाहींत, तो श्रीमंत गृहस्थही नाहीं, ते पोलिसही नाहींत, व ती मोटारही नाहीं ! वसंत मात्र माझ्या शेजारीं खुशाल घोरत पडला होता. मी बिछान्यावर पडलेला होतों, माझ्या हातांत " कमला " मासिक होतें व जवळच मोठा केलेला दिवा जळत होता.

बऱ्याच वेळां अंगाला चिमटे घेऊन मी खात्री करून घेतली कीं, आतां पहातों आहे तें स्वप्न नसून मघाशीं पाहिलें तें स्वप्न होतें.

मी घाईघाईनें उठलों व वसंताला मॉर्निंग-वॉकला बरोबर नेण्यासाठीं उठविलें, आणि स्वप्नाचा विचार करीत करीत मलबार-हिलवर गेलों.

+ + +

दुसऱ्या दिवशीं रविवारच होता.

ठरल्याप्रमाणें मधुकर संध्याकाळीं आलाच; रविवार असल्यामुळें मीसुद्धां मधुकर आला तेव्हां घरींच होतों.

त्यानें कोट-टोपी काढून नेहमींप्रमाणें पंखा हातांत घेऊन आपली आराम-खुर्ची अडविली.

प्रथम दुसरा कोणताही विषय आमच्या दोघांच्या सभेपुढें न मांडतां, मी माझ्या स्वप्नाचाच विषय सभेपुढें चर्चेसाठीं मांडला.

शनिवारीं रात्रीं मला पडलेलें सर्व स्वप्न मी मधुकराला निवेदन केलें.

तें ऐकून त्याच्या थट्टाप्रिय स्वभावसागराला हंसण्याच्या पर्वतप्राय लाटा येऊं लागल्या.

शेवटीं त्यानें मला एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें प्रश्न करावयास सुरवात केली.

"कां हो, फांशीची शिक्षा रद्द करावी, म्हणून लोकांना घसा कोरडा करून सांगणारे व्याख्याते! तुमच्या वसंताचा सूड तुम्ही त्या श्रीमंताच्या डोक्यांत दगड घालून खून करून उगविलांतच ना? म्हणजे श्रीमंत गृहस्थानं केलेल्या खुनाबद्दल त्याचा खून करून तुम्ही त्याला फांशीची शिक्षा दिलीतच कीं नाहीं! आणि म्हणजेच, तुम्ही अप्रत्यक्ष रीतीनं, तुमच्याच म्हणण्याप्रमाणं, तुमच्यांत थोडासा तरी तुमच्या पूर्वजांचा म्हणजेच जंगलीपणाचा अंश आहे, ह्याची कबुली दिलीत कीं नाहीं?"

मधूच्या ह्या प्रश्नांना झणझणीत उत्तरं देऊन त्याचें तोंड कसें गप्प करावें हेंच मला सुचेना, कारण मी आज त्याच्या पूर्ण हातांत होतों.

काल ज्या वेळेस मान उंच करून श्रोत्यांना फांशीची शिक्षा रद्द झालीच पाहिजे, असें कंठ कोरडा करून मी सांगत होतों, त्याच वेळेस आज मी मधुकरासमोर एखाद्या गुन्हेगाराप्रमाणें खालीं मान घालून उभा होतों.

दुसरे दिवसापासून मधूच्या थट्टेला हा नवीनच विषय मिळाला होता.

\+ + +

मी आतां कोणत्या मताचा पुरस्कर्ता आहें हें सध्यां तरी मला सांगतां येणें शक्य नाहीं; कारण हल्लीं मी माझ्या मागील मतांची फेरतपासणी करीत आहें. तेव्हां सहृदय वाचक मी कोणत्या मताचा आहे हें विचारण्याचा त्रास घेणार नाहींतच. परंतु मी तें स्वप्न मात्र कधींही विसरणार नाहीं.



# ताज
# महाल

शांत व सुंदर अशा यमुनेच्या तीरावरील तें शुभ्र दगडाचें सुंदर आणि पवित्र प्रेमाचें स्मारक पाहून, त्या शहाजहान बादशहाला कित्येकांनीं आशिर्वाद दिले आणि कित्येकांनीं तर त्याच्या पत्निप्रेमाला धन्यवाद दिले.

परदेशांतून कित्येक हौशी व कलावंत प्रवासी आले. त्यांनीं "सुंदर कलेचा एक अत्युत्कृष्ट नमुना" म्हणून त्या ताजमहालाचा उदोउदो केला.

असलें सुंदर स्मारक उभारणाऱ्या राजाच्या बुद्धिमत्तेची त्यांनीं तारीफ केली. ललितकथा लेखकांनीं ताजमहालाच्या चबुतऱ्यावर "पवित्र प्रेमासाठीं हापापलेलीं हृदयें खेळविलीं !" कांहीं जणांनीं "त्या सुंदर कलाकृतीचा नकाशा काढणाऱ्या कलावंताचें कोणीच नांव घेत नाहीं" म्हणून सर्वांना दोष दिला.

परंतु एक गरीब पाथरवट. ताजमहाला प्रमाणेंच त्यानें देखील, पत्नीच्या पवित्र प्रेमाखातर जें स्मारक उभारलें ! – तें अमूल्य आणि अतुलनीय नाहीं असें कोण म्हणेल ? पत्नीवरील निस्सीम प्रेमामुळेंच तो वेडा बनला आणि वेडा बनण्याला कारण देखील "ताजमहाल."

परंतु त्यानें उभारलेला "ताजमहाल" जगाला कधींच दिसला नाहीं. द्रव्य दृष्टीनें आंधळया बनलेल्या जगाला गरीबांची पिळवटलेलीं हृदयें दिसलीं तर मग तें "जग" कसलें ? आपमतलबी जगाला धनवानाच्या एखाद्या साध्या कृतींत देखील त्या धनवानाचें पत्नीबद्दलचें उत्कट प्रेम दिसेल, पवित्र प्रेम दिसेल; सारं-सारं कांहीं दिसेल. कांहीं वेळां तर स्वताच्या राजाच्या पुत्राकरितां भोळे भावडे प्रजाजन जीव द्यावयास देखील तयार होतात. परंतु निष्कांचन मनुष्याचें पवित्र प्रेम–पुत्रप्रेम–पत्निप्रेम कधींच कोणाला दिसलें नाहीं ! आणि कधींच कोणाला दिसत देखील नाहीं !

पृथ्वीवर प्रथम पाऊल टाकणाऱ्या एका स्त्रीनें व पुरुषानें ज्ञानवृक्षाचें फळ चाखलें आणि तेव्हां पासून हें जग असें संपूर्ण आंधळें बनलें ? त्याला आतां कोण काय उपाय करणार ?

भवितव्यतेच्या हातामधील जादूच्या "कांडी" कडेच सर्वांचे लक्ष लागलें, तर त्यांत आश्चर्य काय ?

* * +

प्रामाणिक दगडू ! एक पाथरवट होता. स्वताच्या अंगांतून घाम काढून तो स्वताचें पोट भरीत होता. आग्र्याजवळच्या एका खेडेगावांत राहून तो दगडाच्या सुंदर सुंदर मूर्ति करी, सुंदर वस्तु बनवीत असे ! आणि त्यांवरच तो आपल्या बायका मुलांची उपजीविका करीत असे.

एका सुंदर सुप्रभातीं संगमरवरी दगडाचा ताजमहाल बांधण्याचें जाहीर करण्यांत आलें.

त्या बरोबर प्रत्येक कलावंत पाथरवट आग्र्याकडे धांव घेऊं लागला.

त्यावेळचें तें सरकारी काम. तें कोणाला नको असणार ? दगडूला देखील आशा वाटूं लागली.

" घरीं बसून दररोज किती काम मिळेल आणि किती मिळणार नाहीं ह्याचा आपणाला अंदाज नाहीं. चार दिवस काम मिळेल, तर आठ दिवस काम मिळणार नाहीं. अशा अनियमित द्रव्यप्राप्तीपेक्षां सरकारी नोकरी पत्करून नियमित पैसे मिळविलेले काय वाईट ? " दगडूला वाटलें.

आणि आशा झाली तरी ती स्त्रीच आहे ना ? स्त्रीच्या मोहजालांतून कोण निसटले आहेत ? विश्वामित्रासारखे महर्षि तिच्यापुढें लटपटले ! मग आशा रूपी ह्या स्त्रीपुढें यत्किंचित दगडू पाथरवट तो काय टिकाव धरूं शकणार ?

परंतु ही आशारूपी स्त्री—आपल्या पाठीमागें—कित्येक जीवांना नेते आणि नंतर, मृगजलाकडे बोट दाखवीत असते.

तसे पाहिलें तर आज कित्येक दिवस दगडूची पत्नि आजारी होती. दररोज बारीक ताप आल्यामुळें ती बरीच अशक्त झाली होती. तिचे हात-पाय एखाद्या लहानशा पर्णहीन झाडाच्या फांद्याप्रमाणें दिसत होते. मिळालेल्या दोन पैशांतून तो तिला औषधपाणी करी. क्वचित प्रसंगीं शक्तीच्या पलिकडें पैसे देऊन तो वैद्याकडून देखील तिची प्रकृति तपासून घेई.

परंतु आज दोन दिवसांत त्याला एका पैची देखील प्राप्ती झाली नव्हती. तो आज तिला औषध कोठून आणणार ?

आणि तेवढ्यांत ताजमहाल बांधण्याचा जाहिर झालेलें. त्याला वाटलें दोन दिवस आपण जाऊन तेथें पैसे मिळवूं आणि मग हिच्याकरतां आपण औषध आणूं, नाहींतर वैद्यबुवालाच घरीं बोलावुन आणूं.

सरळ मनाचा दगडू त्याला असे वाटलें ! त्याला बिचाऱ्याला काय माहीत, कीं ह्या "वाटण्यानें" केलेल्या विश्वासघातापुढें जीवाच्या जिवलगांनीं केलेला विश्वासघात देखील परवडेल.

ती आजारी होती तरी देखील 'भाकर' बनविण्यासाठीं घरांत ऊठ बस करीत होती. तिला ताप येत होता तरी देखील—

"दोन तीन दिवसांत मी आलोंच." असें तिला सांगून तो आग्ऱ्याला जाण्यास निघाला.

साध्या दगडूला जगाच्या व्यवहारी दृष्टीचा अर्थ नीटसा समजला नव्हता. अंगांतून घाम काढला, कीं रोकड पैसे हातावर पडलेच अशी आजपर्यंतची त्याची प्रामाणिक समजूत होती.

बिचाऱ्याला काय माहीत, कीं ह्या त्याच्या समजुतीला काळीमा फांसणारे कित्येक सैतान पृथ्वीच्या पाठीवर जिवंत आहेत–वावरत आहेत.

आणि ताजमहाल उभारण्यासाठीं तो आग्ऱ्याला येऊन दाखल झाला.

* * *

तो एकेक दगड घेई, हातांतील हत्यारानें तो त्याला निरनिराळे आकार देई. परंतु मनांत आपली प्रियपत्नि कशी असेल त्याचीच तो आकृति काढी. पुरी आकृति दिली गेलेला दगड उचलून, तो नेमल्या ठिकाणीं ठेवण्याकरितां जाऊं लागला, कीं त्याला वाटे आपल्या पत्नीला अंथरुणावरून उठता आलें नाहीं, तर उठण्याकरतां तिला कोणी हात देईल काय ?

दुसऱ्या वेळीं स्वता बनविलेली भाकर खाऊं लागला, कीं त्याला वाटे, आपली पत्नी उठून भाकरी करून खात असेल ना ? आणि " मुमताजच्या " त्या कबरी जवळ तो गेला, कीं त्याचे मन त्याला खाऊं लागे.

त्याला वाटूं लागे......

" कीं अरेरे, ह्या भाग्यवंत महाराणीच्या कबरीवर देखील लाखो रुपयाचे हिरेमाणिक जडविले जात आहेत आणि माझी बायको जिवंत असून मी तिला नीट खावूं घालूं शकत नाहीं, कीं तिची प्रकृति वैद्याकडून तपासून घेऊं शकत नाहीं ! एकीला मृत्यु नंतर देखील जिवंतपणीचे सोहाळे भोगायला मिळत आहेत. तर दुसरीला माझ्या हातून जिवंत असून देखील मृत्युनंतरचे सोहाळे भोगावे लागत आहेत ! "

परंतु ह्यांत वाईट वाटून घेण्याजोगे कांहींच नाहीं. बिचाऱ्या दगडूला काय माहीत, कीं विषमतेनं जगाला इतकं बांधून टाकलंय, कीं " एका जवळ जीवाची चैन करायला भरपूर पैसे असतात, तर दुसऱ्या जवळ दुसऱ्यांच्या जीवावर चैन करायला पैसे असतात. परंतु तिसऱ्याजवळ मात्र स्वताला जीव जगविण्याइतके देखील पैसे नसायचे " हाच जगाचा न्याय ! हीच जगाची नीति ! !

त्या दिवशीं, मनापासुन—अगदीं मनापासून काम केलें आणि आपला वरचा अधिकारी जो मुकादम, त्यापुढें त्यानें पैशाकरतां हात पुढें केले. त्या दिवशीं मुकादमाजवळ पैसे सुटे नव्हते.

" जाऊं द्या, उद्यां मिळतील पैसे " दगडूला वाटलें.

दुसरा दिवस उजाडला. आदल्या दिवसाप्रमाणेंच दगडूनें मनापासून काम केलें.

आणि सायंकाळीं परत त्यानें मुकादमापुढें पैशाकरतां हात पुढें केला; " आज सर्वांचे पैसे माझ्याकडेच आलेले नाहींत, उद्यांच सर्वांचे पैसे देण्यांत येतील. " त्याला उत्तर मिळालें.

बायको तिकडे आजारी; दगडूचा एकेक दिवस म्हणजे कसा जात होता.

आतां जगानें दिलेले गोंडेरी चाबकाचे फटके त्याला जाणवूं लागले.

तिसरा दिवस उजाडला, रोजच्या प्रमाणेंच दगडूनें पैशाकरतां हात पुढें केले, "एक दिवसाचे पैसे आज घे, बाकीचे उद्यां देईन!" मुकादमानें त्याला सांगितलें.

" शेट, उद्यां मला आपल्या घरी जायचं आहे, तिला भेटायचं आहे मी परत परवांला येईन कामावर " दगडू डोळ्यांत आसवें आणून म्हणाला.

आणि सहृदय मुकादमाचें हृदय द्रवलें. " बरं तर दोन दिवसाचे पैसे आज घे. आणि बाकी राहिलेले पैसे मग घरून आल्यावर माझ्याजवळून मागून घे." एक दिवसाचे पैसे मुकादमाच्या घशांत गेले. आणि दगडू–त्यानें तीन दिवस जीवापाड श्रम केले–आणि दोन दिवसाचा पगार घेतला.

जेवढे मिळाले तेवढे पैसे घेऊन दगडू निघाला. त्याला तेवढाच आनंद––

" आतां तरी आपण आपल्या बायकोला औषध नाहींतर वैद्यबुवा आणूं शकूं."

आणि पैशाशिवाय वैद्यबुवा तरी कसे कुठें जातील? आज सारं जगच जर पैशाचे पाय करून चालत आहे, तर मग वैद्यबुवा तरी पैशाची " कुबडी " हाताशीं घेतल्यावांचून कसे चालतील?

त्या आनंदांतच तो घरीं जावयास निघाला. " जीवाचे पाय करून " तो दुसऱ्या दिवशीं सकाळीं निघाला धांवत, पळत, ठेंचा खात, अंगावरून घाम निथळत आणि पैशाची पिशवी प्राणापलीकडे जपत तो आपल्या झोंपडीच्या दारांत येऊन उभा राहिला.

दुर्दैव त्याचें स्वागत करायला दत्त म्हणून हात जोडून त्याच्यापुढें उभें
ोतें. तो घराच्या दारांत उभा राहिला. तरी देखील तेथें त्याला कसलीच
ालचाल आढळली नाहीं. आणि हालचाल तरी त्याला कशी आढळणार ?

भीत भीतच त्यानें घरांत पाऊल टाकलें. त्याची पत्नि पाणी पिण्याकरितां
का हाताचा जोर घेऊन उठून बसली होती. तिच्या हातांत एक पाण्याचें
ालपात्र होतें; तिचें तोंड उघडे होतें; परंतु तिचे डोळे घट्ट मिटलेले होते. आतां
ो एक चैतन्यहीन पुतळी होती.

तिचा जीव दुसऱ्या जगांत विहार करीत होता ! घरांतील हाल चाल
ाहींशी झाली.

आणि तिचा जीव देखील हालचाली बरोबरच निघून गेला !

" विठे–विठे–अग विठे !" त्यानें आपल्या पत्नीला कळवळून हांका
ारल्या, आणि तिनें जेव्हां त्याच्या एकाही हांकेला ओ दिली नाहीं, त्या
ळीं त्यानें एक कर्ण कर्कश किंकाळी फोडली. नंतर स्वतालाच उद्देशून
ारडून म्हणाला.

" ताजमहाल—ताजमहालानेंच माझ्या बायकोचा बळी घेतला " आणि
ा ठिकाणीं–एक क्षण देखील न घालवितां " ताजमहाल—ताजमहाल "
सें ओरडत तो धांवत सुटला.

त्याच्या त्या बडबडण्याचा अर्थ कधीं कोणाला कळला नाहीं. आणि
ा नंतर—

तो स्वतः देखील कधींच कोणाला दिसला नाहीं.



# घुमट
# गोल

विजापुरच्या जगप्रसिद्ध गोलघुमटामध्यें तुम्हीं कोठेंही जरी बारीकसा आवाज केलांत, तरी त्याचा स्पष्ट प्रतिध्वनि किती वेळां तरी उमटला जातो—परंतु आमच्या समाजरूपी गोल घुमटामध्यें तुम्ही न केलेल्या कृतींचे— तुमच्या मनांत न उद्भवलेल्या भावनांचे स्पष्ट ध्वनि सारखे उमटत असतात.

कधीं कोणी कलावंत कारागीर निपजून, हे मनांत न उद्भवलेल्या भावनांचे समाजरूपी गोल घुमटामध्यें उमटणारे स्पष्ट ध्वनि--तो बंद करूं शकेल काय...?

× × ×

प्रकाश आणि किरण ह्यांची अगदीं जुनी ओळख होती म्हणतात! किरणच्या वडिलांनीं ती जुनी जागा सोडली आणि ह्या नव्या जागेंत प्रवेश केला. अर्थात प्रकाश येथें देखील किरण जवळ गप्पा मारण्याकरतां मधून मधून येतच असे. परंतु तो ज्या ज्या वेळीं तसा येई, त्या त्या वेळीं आजुबाजूचे शेजारी जरा कुतुहलानेंच (?) ह्या जोडीकडे पहात असत. पूर्वीच्या जागेमध्यें प्रकाश किती तरी वर्षें किरणचा शेजारी होता, आणि वडिल माणसांसमोर देखील तीं दोघें अगदीं मनमोकळेपणानेंच वागत असत. मोकळेपणानें बोलावयाचें-- खूप खूप लांब फिरायला जावयाचें--एकमेकांच्या सुखासमाधाना करितां तीं दोघें शक्य तों झटत असत, आणि त्याचेंच दोन्ही घरांतील वडील मंडळींना कौतुक वाटत होतें. त्या वेळीं तीं दोघें एकमेकांकडे पवित्र दृष्टी शिवाय दुसऱ्या कोणत्या दृष्टीनें पाहणार?

परंतु कांहीं लोकांचा स्वभावच असा असतो, कीं एखाद्याच्या वागणुकीचा आडवळणाचा निष्कर्ष काढावयाचा. व तोच निष्कर्ष ते ज्याच्या त्याच्या मनांत भरवून देत असतात. आणि त्यांचा हा समाजाला अहितकारक स्वभाव त्यांच्या सबंध आयुष्यांत बदलणें शक्य नसतें.

ज्या वेळीं प्रकाश किरणकडे निरपेक्षमनानें येई, त्या वेळीं त्याच्या मनाला ह्या असल्याच लोकांची भीति वाटत असे. कारण मनुष्य स्वभाव जन्मतःच असा आहे, कीं त्याला स्वतःच्या बाबतींत दुसऱ्याचेंच बोलणें अधिक संयुक्तिक, अधिक बरोबर वाटत असतें. शिवाय दुसऱ्याच्या बोलण्याचा परिणाम आपल्या प्रत्येक कृतीवर कांहीं प्रमाणांत तरी होत असतो, हें कोणी कोणास सांगावयास नको.

प्रकाश किरणच्या घराच्या पायऱ्या चढूं लागला, कीं कोठून तरी त्याच्या कानांवर शब्द येऊन आदळत—

"अरे बाबा, पाणी उगाच वहात नसतं—त्याला उतरत्या जमिनीचीच आवश्यकता असतें!"

कांहीं क्षण स्तब्धता—पुन्हा शांतताभंग—आणि शांत वातावरणांत शद्ब उमटले जात—

"नदीनें कितीही पवित्रपणा आणि सोंवळेंपणा दाखविला व तिनें आडवळणाचा असा कितीही प्रवास केला, तरी तिचा अंतिम हेतु सागराशीं एकरूप होण्याचाच असतो!"

—आणि एक जिना चढून प्रकाश वर गेला, कीं पुन्हा एक दोन वाक्यें त्याच्या स्पष्टपणें कानावर येत......

"ए वसंत, अरे बाबा, तरुण स्त्रीहृदयाचें आकर्षण असेंच जबरदस्त आहे कीं, तें पृथ्वीच्या कोनाकोपऱ्यांत कुठेंही दडलया गेलेल्या सहचराला आपल्याजवळ खेंचून आणीत असतें......!"

आणि हीं वाक्यें ज्यांच्या तोंडून बाहेर पडत असत, ते सारे सुशिक्षित आणि समंजस तरूण असत बहुधा! हीं सारीं वाक्यें प्रकाशाच्या मनांत एकच वादळ उत्पन्न करण्यास कारणीभूत होत.

......"विचाराच्या" लाटा "हृदयाच्या" पृष्टभागावर आपटत आणि त्या "निर्णय" किनाऱ्याला पोंचण्याचा कसोशीनें प्रयत्न करीत......

द्र ध
इं ३४ नु

आणि शेवटीं प्रकाश हतबुद्धच होई......

त्याचीं मनाशीं अशीं प्रश्नोत्तरें होत...

" किरणविषयीं मला सहानुभूति कां वाटते ... ? "

" कोणाविषयीं कोणाला सहानुभूति वाटते—ह्याला उत्तर नाहीं. "

" ती अविवाहित तरूण स्त्री आहे, म्हणून तूं सहानुभूति दाखवितोस...?"

" आपल्या बद्दल सहानुभूति दाखविणारी कुणीतरी व्यक्ति असावी ह्मणून ! "

"मग एखाद्या दुसऱ्या तरुणीबद्दल तूं तशी सहानुभूति कां दाखवीत नाहींस?"

" मला तसे वाटत नाहीं म्हणून ! "

" किरणचें लग्न झाल्यावर देखील, तूं तिच्याबद्दल अशी सहानुभूति दाखविशील... ? "

" होय. अर्थात् – ती जोंपर्यंत माझ्याबद्दल सहानुभूति दाखवील, तोंपर्यंत मीही तशीच दाखविणार... "

" तिचें लग्न तुझ्याशींच लागलें, तर तूं नको म्हणशील ? "

" अर्थात् नाहीं. पण तसा अट्टाहास मी केव्हांच करणार नाहीं "

" तिच्याबद्दल सहानुभूति दाखवून तुला काय मिळतें...? "

" माझ्या महत्त्वाकांक्षेचें उच्चतम शिखर मला स्पष्टपणें दिसूं शकतें... "

...अशा प्रकारचीं कितीतरी प्रश्नोत्तरें मनाशींच करीत, प्रकाश, किरणच्या घराचे ते दोन जिने चढत असे. आणि किरणच्या दिवाणखान्यांत प्रवेश केल्यानंतर—ज्यावेळीं किरण त्याची मोकळेपणानें थट्टा करूं लागे, त्यावेळीं तो अर्धवट लाजे. तिच्या विषयीं तो अर्धवट बेफिकिरपणा दाखवावयास जाई. कारण, किरणच्या ह्या सहवाससुखाबद्दल त्याच्या मनाचा कोणताच निर्णय झालेला नसे.

...त्याची ही चमत्कारिक वागण्याची तऱ्हा पाहून किरण चेष्टा करण्याकरतां हंसत हंसत म्हणे...

" काय प्रकाश, आमच्या घरीं येतांना रस्त्यांत तुला एखादा " टाळा—चावी वाला " भेटून त्यानें तर तुझ्यावर आपली कला चालविली नाहीं ना...? "

अर्थात् प्रकाशला मग स्तब्ध बसणेंच शक्य नसे. तो देखील मग हंसत हंसत उत्तर देई...

" किरण, तसा कलावान मला भेटला—पण मी स्वतःवरच त्याच्या कलेचा उपयोग करून घेतला नाहीं–त्याची कला मी शिकून घेतली आणि आतां मात्र तिचा मी तुझ्यावर उपयोग करून पाहणार आहें "

...आणि मग पुन्हां पूर्वीसारख्या गप्पासप्पांना-इकडल्या तिकडल्या बातम्यांना त्यांच्या संभाषणामध्यें अगदीं ऊत येई–आणि नंतर तीं दोघें खूप लांब फिरावयास जात.

स्त्री आणि पुरुष हीं स्वभावतांच भिन्न प्रकृतीचीं आहेत. सृष्टिनिर्मितीपासून तीं तशी भिन्न प्रकृतीचीं आहेत. आणि कल्पांतापर्यंत तीं तशीच रहाणार...!

त्यापैकीं उदार हृदयी कोण व कठोर कोण, या प्रश्नाचा निकाल लागणें शक्य दिसत नाहीं, व "प्रेम हें विष कीं अमृत ?" ह्या प्रश्नाचें उत्तर अगर निकाल सर्वांना समाधानकारक कधींच मिळणार नाहीं !

सध्यां तरी स्त्री " एकटी " असणें शक्य नाहीं. कारण लग्नाचें वय होतांच, तिचा पिता तिला दुकटी करून सोडतो !

ज्या वर्षीं किरण मॅट्रिक झाली तेव्हांपासून तिच्या विवाहाबद्दलच्या गोष्टी घरांत सुरूं झाल्या–आणि त्या गोष्टी समाजामध्यें वाहत जाऊन तिच्या विवाहाविषयीं लोकांमध्यें निरनिराळे तर्कवितर्क सुरू झाले. कोणी ह्मणूं लागले...

" हें 'वर' पाहाण्याचं सारं ढोंग–अरे प्रकाशला जर किरण मिळाली नाहीं तर प्रकाशचे किरण कुठेंतरी कधीं पडूं शकतील कां ?"

कोणी तर अगदीं बेशरमपणें ह्मणे...

" इतके दिवस ज्यानें तिला वचन देऊन थोपवून ठेविली, तो तिला आतां हातची जाऊं देणार थोडीच...?"

परंतु किरणनें व प्रकाशनें असल्या तर्कटांची कधींच पर्वा केली नाहीं. समाजाच्या अडथळ्याला न जुमातां तीं दोघें आपलीं कर्तव्यें शांतपणें पार पाडीत होतीं...!

परंतु एक दिवस असा आला, कीं त्यावेळीं दोघांना एकमेकांचीं हृदयें एकमेकांजवळ उघडीं करणें भाग पडलें. कारण आयुष्याच्या अशा एका नाजुक पायरीवर येऊन तीं दोघें पोंचलीं होतीं, कीं कोणत्याही बाजूला त्यांचा झोक गेला असता, तर त्यांच्या नाशाला तीं स्वतःच कारणीभूत झालीं असतीं!—तारेवरून चालणाऱ्या कसलेल्या कलावंता-प्रमाणें कोठेंही तोल जाऊं न देतां त्या प्रश्नाचा निकाल नाजुकपणें लावायास पाहिजे होता.

किरणच्या वडिलांनीं सुस्वरूप, सुसंपन्न आणि सुशिक्षित असा एक तरुण पाहिला व त्याच्याबरोबरच किरणचें लग्न लावण्याचें ठरविलें आणि कांहीं दिवसांनीं, त्यांना असें देखील कळलें, कीं किरणची व त्याची इंग्रजीशाळेमध्यें अगदीं गट्टी जमली होती; मग काय, किरण त्या तरुणाला—सुहासाला देण्याचें सर्वानुमतें अगदीं निश्चित करण्यांत आलें.

शिवाय सुहासच्या मोहक वागणुकीमुळें, प्रेमळ मुद्रेमुळें, अघळ-पघळ बोलण्यामुळें किरण त्याच्या सहावासाला नेहमीं भुकेलेली दिसे.

त्याचे ते पाणीदार डोळे—वाऱ्याबरोबर हेलकावे खाणारे कुरळे केस—रुबाबदार छाती—त्याची मूर्ति किरणला आकर्षक वाटे—आणि म्हणूनच ती त्याच्याबरोबर आपलें आयुष्य आनंदानें काढण्यास तयार झाली.

परंतु प्रकाशला जेव्हां ही गोष्ट कळली, तेव्हां त्याला स्वतःला काय होत आहे तेंच कळेना. त्याचें डोकें तेव्हां पासून भणभण करूं लागलें, त्याचें कपाळ तेव्हांपासून दुखण्याला सुरवात झाली, आणि त्याच वेळेपासून हातपाय निरुत्साही बनल्यासारखे त्याला वाटूं लागलें!

"परंतु हें सारं कां...?"

"किरणनें आपल्या विवाहाला संमति दिली, ह्यांत चुकलें कुठें?" त्या प्रश्नाला त्याला कोणत्याही प्रकारें उत्तरें देतां येत नव्हतीं. मग तो स्वतःच्या मनाला विचारूं लागला,

"किरणची मैत्री मी स्वार्थासाठींच केली का?"

" निःसंशय नाहीं... ! "

" मग ती आयुष्याच्या अनोळखी प्रदेशांत भर उत्साहानें पदार्पण करीत असतांना तुला वाईट कां वाटतें... ?"

" वैवाहिक बंधनामुळें मी तिच्या सहवासाला कायमचा मुकणार ह्मणून ! "

" परंतु लग्नानंतर देखील कदाचित् तिच्या सहवासाचा व सहानुभूतीचा तुला लाभ होऊं शकेल... ? "

" तें शक्यच नाहीं—कारण आज तरी हें हिंदूसमाजामधील कोणत्याच पतिदेवाला कबूल होणार नाहीं... "

" मग तिचें लग्न झाल्यावर तिच्याबद्दलची तुझी सहानुभूतीची दृष्टी निवळत जाणार काय... ? "

" मुळींच नाहीं–ती जगाच्या पाठीवर कुठेंही गेली तरी मी तिला सुखी करण्याचा प्रयत्न करीन...... ! "

" मग झालें तर...तुझ्या प्रश्नाचें तुला उत्तर मिळालें. किरणच्या विवाहाबद्दल तूं मनाला वाईट कां वाटून घेतोंस ? " त्याला वाटलें हेच शब्द कोणी तरी अज्ञात व्यक्ति आपल्या कानांत मोठ्यानें उच्चारीत आहे...!

* * *

एक दिवस किरण व प्रकाश फिरण्यासाठीं बाहेर पडलीं—निवांत ठिकाणीं एका जागेवर बसल्यानंतर प्रकाश म्हणाला,

" किरण..."

" काय...? " किरणनें ओ दिली.

" थोड्याच दिवसांत मी तुला अंतरणार..."

" तें कसं काय...?"

" तूं आपला संसार थाटायला सुरवात करणार...? "

" हो...य ! " किरणला देखील प्रकाशची मनःस्थिति आतां थोडीशी कळूं लागली..."

द्र ध

इं ३८ नु

" पण तूं आनंदानेंच हें करीत आहेसना... ? "

" हो... ऽ ...य ! " किरणच्या तोंडामधून अस्पष्ट आवाज बाहेर पडला.

" मग किरण—मला वाईट वाटून घेण्याजोगं त्यांत कांहींच नाहीं—खुशाल तूं दुसऱ्या कोणाचाही संसार जन्मभर चालव—त्याबद्दल तूं वाईट वाटून घेऊं नकोस, किंवा मी देखील घेणार नाहीं—तूं कोठेंही रहा पण सुखी रहा—आणि वेळ पडल्यास संकट प्रसंगीं, आणीबाणीच्या वेळीं मात्र तूं माझी आठवण ठेव-तुझं संकट निवारण करून तुला सुखी करण्यांतच मला आनंद आहे—माझ्या ह्या शेवटच्या विनंतीला नकार देऊं नकोस...! "

जड अंतःकरणानें—प्रकाशनें कशींबशींच तीं वाक्यें पुरीं केलीं—

भरलेल्या डोळ्यांनींच किरणने त्याच्या विनंतीला होकार दिला—आणि जड अंतःकरणानेंच तीं दोघें घरीं परतलीं.

*             *             *

थोड्याच दिवसांनीं सुहास आणि किरण ह्यांच्या लग्नाच्या आमंत्रण पत्रिका वाटण्यांत आल्यावर त्यावर लोक आपापसांतच कल्पनेच्या इमल्यावरच तर्क कुतर्क करूं लागले...

" अरे बाबा, सुहास दिसतांच त्याच्याजवळ किरण लघळपणा करूं लागली तेंच त्या प्रकाशाला आवडलं नसेल, दुसरं काय ?—नाहीं तर फुकटाफुकटी तो असलं किरणसारखं रत्न हातचं थोडंच दवडणार होता !"



# ना
# जु भावना
# क

सुधाकराचें लग्न होऊन आज जवळ जवळ दोन अडीच वर्षें झालीं असतील—त्याचा प्रेमविवाहच झाला होता म्हणाना! सुधा चांगली इंग्रजी सहावी शिकलेली आणि सुधाकर ग्रॅज्युएट. कां नाहीं लोकांनीं कल्पना करूं, कीं त्यांचें एक आनंदी व आदर्श असें जोडपें होईल म्हणून? आणि असें कोणाला वाटलें तर त्यांत त्यांची काय चूक?—

विवाहबद्ध होण्यापूर्वी तरुण-तरुणींचीं मनोराज्यें "सुलेमानी सतरंजीप्रमाणें" कशी आकाशांत भरारी मारतात बरें! पृथ्वी आणि स्वर्ग ह्यांमधील अंतर त्यावेळीं त्यांना दिसत नाहीं? कधीं कधीं आकाशाकडे उडी मारण्याचा प्रयत्न करीत असतांना त्यांचा तोल पाताळाकडे जात असतो-हें देखील त्यांचें त्यांना समजत नाहीं. गगनांत भरारी मारावयाला जवळ कल्पनांचे पंख असले कीं त्यांनां बस्! जमीन त्यांना दिसावयाची देखील नाहीं आणि जमीनीवर राहणें देखील त्यांना आवडत नाहींसें होतें. तसें पाहिलें तर पंख असलेल्या कोणत्या पांखराला जमीनीवर बसून राहणें आवडतें?...... तसेंच मनुष्याच्या मनाचें! कल्पनेच्या पंखाची प्राप्ती होतांच व आकाशांत आपल्याला आवडणारा एखादा बरोबरीचा सोबती दिसतांच तरुण-तरुणी, आजूबाजूच्या परिस्थितीचा-स्वतःच्या शक्तीचा-मार्गांतील अरिष्टांचा--मुळींच विचार न करतां--आकाशांत त्या जोडीदाराबरोबर विहार--नव्हे स्वैर संचार करावयाला धांवतात--आणि विश्व-विजयी विधात्याला त्यांचे पंख कापून टाकून-त्यांच्या आशा जमीनदोस्त करून...त्यांच्या महत्त्वाकांक्षेला मूठमाती देण्यांतच अधिक आनंद वाटतो कीं काय नकळे!......आणि फार दूर कशाला?......आतां सुधाकर व सुधा ह्यांचेंच उदाहरण घ्याना.

द्र ध
इं ४० नु

विवाहापूर्वी सुधाकर व सुधा ह्यांची प्रथम भेट झाली त्यावेळीं दोघांच्या हृदयांत एकाच वेळीं एक अननुभूत आनंदमय भावना संचरती झाली! दोघांना कधीं न "पाहिलेला" आनंद "उपभोगल्यासारखें" वाटलें! दोघांनीं त्या वेळीं मनांत खूप खूप बेत केले—व असेच बेत बहुतेकजण तशा परिस्थितींत करीत असतात!...परंतु लग्नाची बेडी पायांत पडून संसाराच्या बंदिखान्यांत जन्मठेपेची शिक्षा झाली, कीं त्यांतल्या कितीशा आशा पूर्ण होतात—कितीसे बेत तडीस जातात, हें त्यांचें त्यानांच ठाऊक.

सुधाकर उमद्या व रसिक वृत्तीचा एक महात्वाकांक्षी तरुण होता. "स्त्रियांना समान हक्क," "स्त्री स्वातंत्र्य" वगैरेचा तो भोक्ता होता, आणि "हिंदी स्त्रियांचा दर्जा जगांतील इतर स्त्रियांच्या बरोबरीचा करावयाचा!" हीच त्याची एक आवडती महत्वाकांक्षा होती. "स्त्री-पुरुषांना समान हक्क दिले पाहिजेत!" असें म्हणणाऱ्या लोकांचा तो अग्रणी होता, आणि त्या विषयावर-लिहितांना त्याची लेखणी व बोलतांना त्याचें तोंड कशाचाच धरबंध ठेवीत नसे!

शिवाय तो सुस्वरूप, सुसंपन्न आणि सशक्त व मोकळया स्वभावाचा होता. मग "असा पुरूष आपलाच व्हावा-त्याच्यावर फक्त आपलाच ताबा चालावा-त्याच्या सहवासांतच आपण आपला जन्म घालवावा," असें कोणत्या चतुर--सौंदर्यरमणी महत्वाकांक्षी तरुणीला वाटणार नाहीं? ...आणि आमची सुधा कांहीं या नियमाला अपवाद नव्हती. सुधाकराला पाहिल्यावर तिच्या मनांत विचार आले—अशा तरुणाबरोबर जर माझा विवाह झाला—तर—? "भावी स्वर्ग सुखाची देखील मी अपेक्षा करणार नाहीं—हाच जर मला जन्माचा जोडीदार लाभला, तर मी एक आदर्श संसार करून दाखवीन; प्रेमी तरुण दांपत्य आपल्या आकांक्षा, संसार चालवून देखील कशा पार पाडूं शकतं, त्याचं प्रत्यंतर मी दुनियेला आणून देईन. असमाधान आणि दुःख हे शब्द देखील मग माझ्यापासून दूर-दूर राहूं लागतील!"

आणि काय योगायोग पहा—त्या वेळीं सुधाकराच्या मनांत सुधेविषयीं असलेच विचार चालू होते.

......परंतु आतां त्यांची " विवाहपूर्व " परिस्थिति अवलोकन करा आणि त्यांच्या " विवाहोत्तर " परिस्थितीकडे दृष्टी फेंका— !

एकमेकांच्या इच्छेनुसार एकमेक जवळ आल्यावर एक निराळेंच चित्र दिसूं लागलें. लग्नापूर्वी लग्नानंतर आपल्या दोघांमध्यें अशी परिस्थिति उत्पन्न होईल, असा नुसता संशय देखील त्या दोघांना कधींच आला नव्हता.......पण भविष्यकालच असा आहे, कीं आपण पूर्वी ज्यांची कधीं अपेक्षा केली नव्हती, असेच प्रसंग आपल्यापुढें आणून तो उभे करीत असतो. संसाराला सुरवात केल्यानंतर सुरवातीचे कांहीं दिवस दोघांना सुखाचे असेच वाटले. नवा नवा कार्यक्रम दररोज दोघेजण आंखीत होतीं, आणि तो उत्साहानेंच त्यांच्याकडून पार पाडला जात होता. कित्येक वेळां पाकशास्त्रांतील अज्ञात वस्तूंची माहिती सुधा सुधाकराला करून देत होती, आणि पूर्वी कधीं जें सुख सुधेनें अनुभविलें नव्हतें, तें ती सुधाकराच्या साहाय्यानें अनुभवीत होती. बाहेर निघतांना फॅशनेबल कपडे आणि सौंदर्य साधनें यांचा भरपूर उपयोग ती करीत असे. स्नो, क्रीम्स-ब्रिलियनटाइन्स—सर्वांचीच सुबत्ता ! आणि दररोज नव्या नव्या ठिकाणीं तीं दोघें जोडीनेंच फिरावयाला जात. किती तरी वेळां तें दांपत्य सिनेमा पाहण्यास जाई. पुष्कळ वेळां त्यांच्या खाशा स्वाऱ्या आपला मोर्चा नाटकाच्या थिएटरकडे वळवीत ! सुधेनें त्यापूर्वी कधीं इंग्लिश टॉकी पाहिली नव्हती. पण, म्युझिअमसमोर असलेल्या " रीगल " सिनेमांत तिनें " ग्रीटा गार्बोची " " क्वीन क्रिफियाना " ही फिल्म पाहिल्यापासून ती कोणताच देशी चित्रपट पाहीनाशी झाली ! त्या थिएटरमध्यें प्रत्येक आठवड्याला लागणारा नवा खेळ तीं दोघें न चुकतां पाहत असत ! शिवाय सुधाकराबरोबर सुधेला अपोलो बंदरची हवा खावयास मिळत गेल्यामुळें ती " चौपाटीचा " तिरस्कार करूं लागली.

घरीं देखील तिला सुख देण्याकरितां सुधाकर किती धडपडत होता...! सुधेला आपली गाण्याची भूक शमवितां यावी म्हणून त्यानें एक चांगल्यापैकीं हार्मोनियमही खरेदी केला होता–स्वतःच व पत्नीचें मन रिझविण्याकरितां त्यानें एका चांगल्या मेकरचा फोनो देखील खरेदी केला होता–शिवाय लहानसा सुंदर कोच—एक गादीची खुर्ची–लहानशी "पर्शियन कार्पेट" ह्या वस्तूंनीं देखील त्यानें आपलें घर शृंगारिलें होतें. सुधेला तिच्या विणकामांत मदत व्हावी म्हणून "Needle Work," "Home" वगैरे निरनिराळीं इंग्लिश मासिकें देखील तो दर महिन्याला खरेदी करीत असे. आपल्या लहानशा पगारांत तो हातपाय सांवरून–रूबाबदार पद्धतीनें रहात होता–असें थोडक्यांत म्हणावयास मुळींच प्रत्यवाय नाहीं. पण...... "पण" अथवा "परंतु" हे दोन शब्द गोष्टीमधील खलनायकाला अगर नायिकेला आमंत्रण–किंवा गोष्टीच्या नायकनायिकेवरील भावी संकटाची पडछाया !

सुधेला कुंदा नांवाची मुंबईमध्येंच राहणारी एक अविवाहित, कॉलेजमध्यें जाणारी तरुण मावस बहीण होती......आणि केवळ ही कुंदा सुधेकडे राहावयास आली म्हणूनच सुधेच्या संसारसूर्यास खग्रास ग्रहण लागलें. कुंदा म्हणजे एक चतुर आणि बडबडी मुलगी. तिची बडबड मनापासून ऐकणारा श्रोता तिला लाभला, कीं त्या श्रोत्यावर तिची छाप बसलीच म्हणून समजावें ! तरुण म्हटला, कीं तें तिचें भक्ष्यच म्हणून समजावें ! एखाद्या तरुणाला पकडून त्याची टर उडविण्यांत तिला मनापासून मोठा आनंद होत असे. स्त्रीस्वातंत्र्याबद्दल आणि स्त्री–पुरुषांच्या समान हक्कांबद्दल तिचीं मतें ऐकून पुरुषांनीं देखील आपलीं बोटें क्षणभर तोंडांत घालावीं........त्यामुळें स्त्री स्वातंत्र्यप्रेमी सुधाकराची व तिची गांठभेट होतांच—दोघांना आपल्या विषयावर वाद करावयाला फार गंमत

वाटे-आणि तें त्यांचें बोलणें अगदीं अनंत असे. वास्तविक कॉलेजला उन्हाळयाची सुटी होती, म्हणून मुंबईतल्या मुंबईंत राहणाऱ्या आपल्या मावस बहिणीकडे कुंदा गंमतीखातर रहावयास आली म्हणजे ती सुधेची पाहु-णीच होती म्हणाना-तेव्हां तसें म्हटलें तर तिनें जरा मर्यादेनेंच वागावयास पाहिजे होतें......परंतु कुन्दा कोणाची, कोणत्याहि प्रकारची पर्वा न करतां खुशाल पुढच्या खोलींतील गादीच्या कोचावर पडून सुधाकराशीं तासन्तास गप्पा मारीत बसत असे....... परंतु सुधेला तर हें मुळींच पसंत पडत नव्हतें; आणि स्त्रियांच्याच दृष्टीनें पाहिलें तर आपल्या स्वतःच्या बहिणीनें आपल्या पतीजवळ अगदीं मोकळेपणानें खूप वेळ गप्पा मारीत बसावें हें कोणत्या तरुणीला सहन होईल ? कारण अशा स्त्री-पुरुषांमधील गप्पांचें अथवा मैत्रीचें रुपांतर शेवटीं कशांत होतें-ह्याची विशेषत: स्त्रीवर्गाला तीव्रतेनें जाणीव असते. आणि दुर्दैव-निखालस दुर्दैवच तें सुधेचें... ! कारण हा नियम सुधेच्या बाबतींत देखील अगदीं "सत्यमय" ठरला !

अलीकडे सुधाकराचें घरांतील सारें लक्ष उडून तें एकट्या कुंदेवर बसलें होतें. घरांत काय पाहिजे आहे, कशाकरतां सुधा जेवणासाठीं नडली आहे, सुधेला पातळें वगैरे आहेत कीं नाहींत, तिच्या जवळ पैसे उरले आहेत कीं नाहींत, ह्याची देखील सुधाकर वास्तपुस्त करीत नसे ! इतकेंच नव्हे, पण कुन्दा त्यांच्याकडे राहावयास आल्यापासून इतक्या दिवसांत त्यानें सुधेपाशीं एक शब्द देखील उच्चारला नव्हता. पण "आपण सुधेशीं इतक्या दिवसांत बोललों देखील नाहीं," हें सुधाकराच्या स्वतःच्या तरी कुठें ध्यानीं मनीं होतें ? तो आपला कुंदेशीं गप्पा मारण्यांत, तिच्या बरोबर फिरायला जातांना वादविवाद करण्यांत, तो अगदीं दंग होऊन गेलेला असे ! आपण आपल्या पत्नीशीं ही प्रतारणा करीत आहों असें त्याच्या स्वप्नीं देखील आलें नाहीं, आणि सुधेची परिस्थिति काय आहे याची देखील त्यानें पर्वा केली नाहीं. तोंड दाबून बुक्यांचा मार सुधेला सहन करावा लागत

होता म्हणा ना ! कारण पति ह्या नात्यानें तिला त्याच्याशीं वागायलाच मिळत नव्हतें. सकाळ झाली कीं सुधाकर चहा पीत आणि वर्तमानपत्र वाचीत बाहेरच्या खोलींत कोचावर पडे. आणि कुंदेचा चहा पिऊन झाला, कीं ती त्याच्या जवळ वर्तमानपत्रांतील बातम्यांवरून त्याच्याशीं वादविवाद करीत बसे...त्या तिच्या गप्पा आटोपल्या कीं, सुधाकर जेवण उरकून ऑफीसचा मार्ग धरी.. ...पुन्हा तो संध्याकाळीं आल्यावर.....तो स्वतः होऊनच बाहेर फिरावयाला जाण्याचा बूट काढी. अर्थात् कुंदा बरोबर असल्याकारणानें त्याच्याबरोबर फिरायला जाणें सुधेला बरें वाटत नसे. ती आतांशा असें म्हणूं लागली होती, कीं फिरावयाला जाऊन तेवढा वेळ फुकट दवडण्यापेक्षां तेवढ्या वेळांत एखादें पुस्तक थोडें तरी वाचून होईल, अगर एखादा रुमाल अधिक विणून होईल ! कुंदा आणि सुधाकर ह्यांच्या वागण्याची ती विलक्षण पद्धति ज्या ज्या वेळीं तिच्या डोक्यांत येई, त्या त्या वेळीं तिचें मन दुःखाचें निःश्वास सोडीत विषण्ण होई. कुंदा तिची सख्खी मावस-बहीण, परंतु आतां तिला ती "सवतीप्रमाणें" डोळ्यांत सलूं लागली. आणि अशी परिस्थिति स्वतःच्या घरांत उत्पन्न झाल्यावर कोणत्या स्त्रीचें मन आनंदी आणि उत्साही राहील ? पाहुणी म्हणून आलेली कुंदा कांहीं दिवसांनीं आपल्या स्वतःच्या घरीं गांवदेवीला राहावयास गेली. सुधाकर गिरगावांत राहत होता. दोन घरांमध्यें कांहीं म्हणण्यासारखें अंतर नव्हतें. संध्याकाळीं ऑफिस-मधून येतांना तो कुंदेच्या घरीं एक तरी खेप घाली आणि कधीं कधीं तेथूनच तीं दोघें नंतर फिरावयास जात. ऑफिस सुटल्याबरोबर सरळ घरीं—सुधेकडे—असा किती तरी दिवसांत तो आलेला नव्हता. भडकलेल्या ज्वालांमध्यें तेल टाकलें म्हणजे जसें होतें—तशीच सुधेच्या मनाची स्थिती—सुधाकराच्या ह्या एकेक विक्षिप्त वागण्यानें होत होती. पति जिवंत असून तिच्या नशिबीं संसारसुख नव्हतें. कारण आतां तर तो घरांत बिलकूल लक्ष देत नव्हता. तो सुधेशीं बोलण्याकरतां येई—तें फक्त हेंच विचारण्याकरतां, कीं "आज कुंदा आली होती कां आपल्या घरी ?" आणि त्याच्या ह्या प्रश्नानें सुधेच्या कपा-

ळावर आंव्यांची गर्दी होई. मग तो कोट टोपी घालून बाहेरचा रस्ता सुधारीत असे.

अशा परिस्थितींत देखील, मनाचें समाधान करून जीवन कंठण्याला किती सायास पडतात तें पुरुषांना कळणें शक्य नाहीं ! अशा वेळचीं स्त्रियांच्या मनाची स्थिती स्त्रियाच जाणोंत ! आपला पति आपल्या डोळ्यांदेखत आपल्याशीं प्रतारणा करून दुसऱ्या स्त्रीशीं प्रेमाचे खेळ खेळत आहे, तिच्या विषयीं सहानुभूति दाखवीत आहे, हें सारें डोळ्यांनीं पाहत असून देखील......आर्य स्त्री काय करणार ?

परंतु भविष्याच्या पोटांत दडी मारून बसलेला असा एक सुदिन आला, कीं तिच्या सख्या भावानेंच तिला ह्या परिस्थितींतून मुक्त होण्याचा मार्ग दाखविला ! आणि तो म्हणजे—

मर्दानी नाजूक भावनेवर, एक जनानी लहानसा प्रहार !

एखाद्या गलबताचें शीड वाऱ्यामुळें सर्व फाटून गेलेलें असावें—सुकाणूं समुद्राच्या लाटांच्या धक्काबुक्क्यांनीं अगदीं मोडकळीस आलेलें असावें आणि अशा परिस्थितींत त्या गलबतानें भयंकर वादळी वाऱ्यावरून आपला प्रवास सुरू केला—तर त्याची स्थिति ज्याप्रमाणें होईल तशीच सुधेची झाली होती; स्वतःच्या संसार नौकेंत बसून—व्यवहारसागर ओलांडून—ती आपलें इच्छित स्थळ गांठावयास अगदीं उत्सुक झाली; पण ऐनवेळीं तिच्या कर्णधारानेंच तिला दगा दिला...त्याला पोहतां येत होतें—दुसरी एक आकर्षण करणारी वस्तु व्यवहारसागरांत दिसतांच त्यानें त्यांत उडी घेतली. आणि विचारी सुधा—त्या तशा वादळी वाऱ्यांत—त्या कर्णधाराच्या संसारनौकेंत एकटीच बसून राहिली.

आणि तशा स्थितींत देखील मनाचें कसें बसें समाधान करून बरेच दिवस तिनें काढले. परंतु "आशा" आणि मनाला "मारून मुटकून दिलेलें समाधान" हीं किती वेळ टिकणार ?...... उसनें ज्ञान कितीसें सहाय्यक ठरतें ?......तितकेंच !

कांहीं दिवस गेल्यानंतर सुधेला स्वतःच्या जीवनाचा अगदीं कंटाळा आला.

" मीं विधवा झालें असतें तरी देखील बरं झालं असतं, अथवा अगदीं आंधळी झाल्यें असतें तरी उत्तम! पण माझ्या देखत माझ्या संसाराचा खेळखंडोबा झालेला पाहायला नको." अशा प्रकारचे उद्गार सुधेच्या तोंडून निघूं लागले. आणि कोणत्याही स्त्रीच्या तोंडून त्या तशा जाचामध्यें—अगदीं मानसिक जाचामध्यें—असेच उद्गार खात्रीनें निघाले असते.

......परंतु मनुष्यानें जडदेहाचा त्याग केल्यानंतर देखील त्याला " आशा " असते...मग जोंपर्यंत जीवांत जीव आहे तोंपर्यंत ती तशी कां नसावी?—जन्माबरोबरच प्रत्येक प्राणिमात्राची " आशा " ही सहचरी बनत असते. अगदीं विनावेतन ती प्रत्येक प्राणिमात्राची जन्मभर नोकरी करीत असते. आणि शेवटपर्यंत ती इतकी विश्वासू आणि प्रामाणिक असते, कीं मेल्यानंतर देखील ती मागें राहत असते.

सुधेला साहजिकच वाटलें— " आपण जन्मलों आणि केवळ पतीच्या दुराचरणामुळेंच आपण जीव दिला." असा आपल्या पतीचा दुर्लौकिक व्हायला नको-मग त्यापेक्षां आपण जन्मलेंच नसतों तर काय वाईट झालें असतें?- आपण शिकलों सवरलों आणि जगांत नांव कमविण्याची लहानशीच कां होईना, पण एक महत्त्वाकांक्षा उराशीं बाळगली! तिचा शेवट काय?......मग आपल्या-पेक्षां अडाणी स्त्रिया पुष्कळ पत्करल्या—आपल्या पतीचें आपल्या पत्नीशीं पटत नाहीं असें दिसतांच त्या काडीमोड करून " म्होतुर " लावण्याच्या मार्गाला लागतात, मग आपल्यामध्यें " विशेष " तें काय? आपण पांढरपेशे—सुशिक्षित-आणि थोडेसे पैसेवाले, म्हणून आपल्याला कांहीं भावना नाहींत असें थोडेंच? आणि कांहीं झालें तरी निसर्गाच्याविरुद्ध कसें जातां येणार? अशा परिस्थितींत त्या खालच्या वर्गांतील स्त्रियांची परिस्थिति फार उत्तम! अगदीं शेवटचाच आशेचा अथवा निराशेचा उपाय म्हणून आपल्या विभा-दादाला एक सविस्तर पत्र लिहिण्याचें सुधेनें ठरविलें—!

" पण त्यापेक्षां " तिच्या मनांत विचार आला. "...कुंदेचेच डोळे चांगले उघडण्याकरतां तिलाच एक कानउघाडणीचें पत्र पाठविलें तर... ? "

आणि एके दिवशीं मनाचा निर्धार करून तिनें दोन पत्रें लिहिलीं—

गिरगांव,
सुधा-कुंज

प्रिय दादा--

कदाचित् माझें हें तुला पहिलें आणि शेवटचेंच पत्र ठरणार असेल... ! इतके दिवस तुझ्या मनाला वाटेल तेव्हांच तूं माझी चौकशी करण्याकरितां मुंबईला येत होतास, तर तुझ्या तिकडे पत्र लिहिण्याची मला गरज भासली नाहीं, आणि आतां तशी कां भासत आहे, तें तुला माझ्या पत्राचें दर्शन होतांच कळेल !

दादा-माझें हें संपूर्ण पत्र वाचून तुझी खात्रीच होईल, कीं " माझी भगिनी हल्लीं आहे त्यापेक्षां विवाहापूर्वी किती तरी पट सुखी होती. "...निदान अशा प्रकारची सध्यां मी तरी आशा करीत आहें.

विभा, विवाहसंस्थेचें ध्येय, उद्देश आणि कर्तव्यें कृपा करून तूं मला समजावून सांगशील काय ? " धर्मेच अर्थेच कामे च नातिचरामि " अशी, अग्नी देव आणि ब्राह्मण ह्यां समक्ष घेतलेली शपथ, पति ह्मटल्या गेलेल्या व्यक्तीनें केवळ आपल्या लहरीखातर पायाखालीं तुडवून दुसऱ्या एका कुमारिकेबरोबर प्रेमाचे खेळ खेळावे असा मंत्र "वैदिक" विवाह पद्धति अगर दुसरी कोणती विवाहपद्धति देते काय ? ......स्वतःच्या पत्नीपेक्षां अधिक स्वरूपवान, अधिक शिकलेली, अधिक चतुर अशी एखादी स्त्री दिसतांच पुरुषानें त्या स्त्रीजवळ पत्नीपेक्षां देखील अधिक मोकळेपणानें वागण्यांत कांहींच गुन्हा नाहीं काय ? पत्नी ह्मणजे एक विकत घेतलेली मोलकरीण, तिला स्वातंत्र्य-विचार-विकार नाहींत- भावना नाहींत, असेंचना तुमच्या पुरुषजातीचें ह्मणणें... ? एका पुरुषानें कितीही पापाचरण-कितीही

" बायका " केल्या तरी क्षम्य ! समाज त्याला कांहींच शिक्षा करूं इच्छित नाहीं ! एखाद्या पुरुषानें– भुंग्याप्रमाणें–ह्या कमळाचा रस चाख, त्या कमळावर उडी मार—अशा वृत्तीनें वागलें तरी चालतें– त्यांत कांहींच गुन्हा नाहीं ! उलट समजा, एखाद्या स्त्रीकडून अशाच प्रकारें अगर ह्यापेक्षां सौम्य असें वर्तन घडलें तर...... ?

आमच्या पुरातन, पवित्र आर्य धर्माला कालिमा फांसला जाईल ना...! विभादादा, हें पत्र मी लिहीत आहें--मीं एखादी विदुषी नाहीं, कीं समाजांत चाललेल्या अन्याया विरुद्ध बंड करून संकटांत सांपडलेल्या माझ्या भगिनींना मी सहाय्यक अगर मार्गदर्शक होईन. दादा–मींच आज एका मोठ्या संकटांत सांपडलें आहें. आणि तुझ्यासारख्याचें साहाय्य मिळवून देखील त्यांतून सुटण्याची आशा मला दिसत नाहीं--ह्या परिस्थितीचा मी विचार करूं लागलें, कीं केशवसुतांची ती " जायाचें जग कां असेंच - " ही कविता मला आठवते. विभा, माझ्या लिहिण्याचा अर्थ तुला चांगलाच समजला असेल नाहीं ? पण तरी देखील माझ्या मनाच्या समाधानाकरितां मी तुला स्पष्टच लिहितें–वाच, तुझ्या बहिणीची कर्मकथा नीट वाच ! विभा, तुझे जिवलग मित्र— तुझ्या बहिणीचे देवांब्राह्मणांसमोर बनलेले पति, आज दुसऱ्या एका–दुसऱ्या कशाला, आतां स्पष्टच लिहितें—आपल्या कुंदाचे पूजारी बनून– आपल्या पत्नीच्या इच्छा व विचार पायदळीं तुडवून तिच्याकडे अगदीं दुर्लक्ष करीत आहेत.

आणि आमच्या घरांतील ही परिस्थिति अशीच राहूं द्यावयाची त्या परमेश्वराची इच्छा असेल–तर त्या इच्छेप्रमाणें घडून येण्याकरितां मला त्या परमेश्वराकडेच धांव घ्यावी लागेल.

तरी पण दादा, घाबरूं नकोस. मी " आर्य स्त्री " आहे. माझा निश्चय पार पाडतांना मी कचरेन देखील. कळावें, अधिक काय लिहूं......?

तुझी, स्वतःच्या जिवास कंटाळलेली—दुःखसागरांत गटंगळ्या खात असलेली—

—दुर्दैवी भगिनी—

सुधा

* * *

विभाकर आणि वत्सला आज आपला "मॉर्निंग वॉक" जरा नेहमींपेक्षां अंमळ लवकरच उरकून घरीं आलीं होतीं. दोघें फिरून घरीं आल्यावर वत्सला स्नान करावयास गेली आणि विभाकर चहाचा एकेक घोट घेत घेत वर्तमानपत्र वाचीत पुढील व्हरांड्यांत आराम खुर्चीवर पडला-निरनिराळ्या ताज्या बातम्यांवरून त्याची तीक्ष्ण नजर फिरूं लागली.

इतक्यांत घरासमोरील फाटकांतून पोस्टमन-"विभाकर रामचंद्र गडकरी" असें म्हणत आंत आला. विभाकराच्या हातीं त्यानें पत्र दिलें आणि तो निघून गेला. कोणाचें पत्र आहे तें पाहण्याकरितां वत्सला देखील पुढें आली-आणि विभाकराच्या खुर्ची मागें जाऊन उभी राहिली.

सुधेचें तें पत्र वाचून पूर्ण होतांच विभाकराचा चेहरा गोरामोरा झाला. नंतर त्या पतिपत्नींचें कांहीं बोलणें झालें, आणि शेवटीं वत्सलेने ह्या सुधेच्या परिस्थितीवर एक रामबाण उपाय सुचविला. विभाला तो पूर्ण पसंत पडला. त्या बेताप्रमाणें वागण्याचें दोघांनींही ठरविलें !

दोन तीन दिवसांनीं विभा पुण्याहून मुंबईला आला. त्यानें आपला सर्व बेत यथास्थित सुधेला कळविला. व सुधेनें देखील तो शेवटचा प्रयत्न करून पाहण्याचें ठरविलें. त्या एक दोन दिवसांत सुधाकराची व कुंदेची वागणूक विभानें न्याहाळली-आणि सुधाकराचा व सुधेचा निरोप घेऊन तो तो पुण्यास जाण्यास निघाला. जातां जातां तो सुधेला हळूच म्हणाला—

"सुधे" पुरुषांच्या ह्या "नाजूक भावनेला" धक्का बसला, कीं हटकून ते ताळ्यावर आलेच म्हणून समज." आणि तो पुण्यास निघून गेला.

## द्र ध
## इं ५० नु

कांहीं दिवसांनंतर कुंदेबरोबर मलबारहिल वगैरे धुंडून व मनमुराद गप्पाष्टकें झोडून—सायंकाळीं सुधाकर घरीं आला, आणि टोपी खुंटीवर ठेवून व कोट भिंतीवर अडकवून नेहमींप्रमाणें तो टेबलाजवळ गेला व आतुरतेनें तेथील पुस्तकें त्यानें चाळलीं-त्याला वाटलें कांहीं तरी नवीन पुस्तक दिसेल तसें दिसलें नाहीं, ह्मणून तो मागें फिरणार- इतक्यांत परत तो टेबलाजवळ आला व अगदीं चुरगळलेला-गुंडाळा करून फेंकून दिलेला एक गुलाबी कागद तेथें त्याला दिसला. तो त्यानें घेऊन त्या कागदाचें निरीक्षण करावयास सुरवात केली, आणि तें पत्र असून " प्रिय सुधे " अशी त्यांतील सुरवात पाहून त्यानें तें पूर्ण वाचावयास घेतलें—

" प्रिय सुधा--

तुझें बरेच दिवसांत पत्र नाहीं, त्यामुळें माझी स्थिति चमत्कारिक झाली आहे. तुझी भेट नाहीं, तर नाहीं; पण तुझ्या दर्शनामुळें तरी मी सुखी होत होतों-पण आतां तें देखील नाहीं...! माझ्यावर तूं रुसली तर नाहींस...? सुधे, तुझ्या भेटीसाठीं माझा जीव किती अधीर झाला आहे म्हणून सांगूं? खरेंच, आतां तुझी भेट केव्हां...?

" तुझ्यावर मनापासून प्रेम करणारा तुझाच, विराग "

पत्र वाचून पूर्ण होतांच सुधाकरच्या रागाचा पारा इतका चढला, कीं त्याच्या समोर सुधा असती, तर त्यानें रागाच्या आवेशांत प्रथम तिची मानच दाबली असती; सुदैव तिचें, कीं ती तेथें नव्हती. परंतु एका हातांत तें पत्र धरून-आणि दुसऱ्या हातानें आठया आलेल्या कपाळावरील केस बाजूला सारीत तो म्हणाला—म्हणाला कसला, ओरडलाच......

" सुधे-ए सुधे ! "

" ओ--आलें...! "

" तुला हें पत्र कोणीं लिहिलें आहे...? "

" ज्यानें पत्राखालीं सही केली आहे त्यानेंच ! "

" हा विराग कोण... ? "

" तुमच्याच जातीचा एक पुरुष...! "

" आणि त्याचें तुझ्यावर प्रेम...? "

" होय--अगदीं मनापासून......! "

" शरम नाहीं वाटत--असलीं उत्तरें द्यायला ? "

" कां वाटावी...? "

" कां वाटूं नये...? "

" तुम्हांला असें वागतांना कांहीं वाटत नाहीं म्हणून ! "

" म्हणजे—तुझ्या बोलण्याचा अर्थ...? "

" कुंदेशीं मोकळेपणानें वागतांना तुम्ही माझ्या भावनांचा विचार करतां ? "

" म्हणजे, सुधे, तशीच तूं या विरागजवळ वागतेस...? "

" होय–अगदीं तश्शीच...! "

वर्मीं बाण लागला तर मला वाटतें दगड देखील सहृदय होईल. मनुष्याच्या मनाची देखील अशी गंमत आहे, कीं सांगून त्याला कांहीं गोष्टी उदाहरणानेंच पटवून द्याव्या लागतात......मगच त्याचे डोळे उघडतात !

सुधाकराचे सुधेनें त्या पत्रानें चांगलेच डोळे उघडले, आणि त्याला शेवटीं तिनें सांगितलें, कीं " विराग " ही व्यक्ति दुसरी कोणी नसून तिचा दादा विराग होता. कारण विभाच्या साऱ्या नांवाची प्रथमाक्षरें घेतली तर "विराग" नांव बनतें. पाहा, विभाकर रामचंद्र गडकरी आणि तें पत्र विभाकराचेंच होतें; तें सिद्ध करण्यासाठीं पुण्याला जाण्याचें ढोंग करून मुंबईला राहिलेला विभाकर सुधेच्या घरीं येऊन दाखल झाला. कुंदेला आपली चूक चांगलीच कळून आली. आणि सुधाकर पूर्वीप्रमाणें सुधेजवळ वागूं लागला. थोडक्याच दिवसांत सुधेच्या घरीं एक पंचपक्वान्नांचे जेवण झालें, त्याला वत्सलादेखील पुण्याहून आली होती.



# प्रतिज्ञा

दुपारचें रखरखीत ऊन्ह पडलें होतें. सगळीकडे सूर्यानें आपली सारी शक्ति एकवटून पृथ्वीला तापवून टाकण्याचेंच मनामध्यें आणलें होतें, कीं काय कोणास ठाऊक...? मधून मधून वारा इकडून तिकडे विहार करीत, पृथ्वीला शांत आणि थंड करण्याचा प्रयत्न करीत होता. पण त्याचा कांहीं विशेष उपयोग नव्हता. त्या तशा वेळीं नुसतें माणूसच नव्हे, पण जनावर देखील कुठें फिरकत नव्हतें ! सर्वांनींच कुठे दडी मारली होती कोणास ठाऊक ? एकंदरींत त्या वेळीं सगळीकडे शांतताच पसरली होती.

एका उजाड माळरानावर त्या भयंकर उन्हामध्यें एक माड ताटकळत, एखाद्या हटयोग्याप्रमाणें उभा होता. मधून मधून वारा त्याचीं पानें हालवीत होता. तेवढीच त्याची हालचाल ! त्या माडाजवळ एक लहानशी सांवली पडली होती. बराच वेळ झाल्यानंतर ती सांवली माडाला म्हणाली...

" त्या बाजूला जरा उभे रहा कीं ! ह्या उन्हात उभं राहून स्वत:बरोबर मला कशाला एवढी तापवता ? " किंचितही हालचाल न करतां माडानें उत्तर दिलें,

" बाईसाहेब, जास्त गमजा करूं नका. लग्नापूर्वींच मी तुम्हांला सांगितलं होतं, कीं लग्न करायचं असेल माझ्याबरोबर तर लग्न झाल्यानंतर बारा तास माझ्याबरोबर, मी जसा आणि जेथें राहीन तेथें तुम्हाला राह्यलं पाहिजे आणि ह्याला तुम्ही कबुली दिलीत म्हणून मी तुमच्याशीं लग्न लावलं हें लक्षांत आहे ना ? "

" हो-हो-तें खरं-पण लग्न झाल्यापासून मी पहात्यें आपण कधीं जागचें तसूभर तरी हललां आहां काय...कीं कधीं माझी इच्छा तुम्ही विचारली होतीत कां...? "

" हें...पहा, हें नसतें नवे थेर मला नको आहेत. मला जगायचं आहे आणि जगतां जगतांना मानव समाजावर मला थोडे फार उपकार करावयाचे आहेत. माझ्यापुढें कांहीं तरी कार्य करण्याचं ध्येय आहे समजलीस.. ? "

" हो हो समजलें. मोठे आले आहेत ध्येयवादी आणि जशी कांहीं आमची क्किमतच नाहीं ...? "

" नाहींच मुळी, तुझी काय किंमत आहे...? "

" एखादा रसिक येऊन द्या म्हणजे तो पहा माझाच फोटो नाहीं तर चित्र काढील. तुम्हांला नाहीं विचारणार ? तुमची किंमत फार तर एखाद्या अडाणी भंडाऱ्याजवळ ! मी शेजारीं सतत असतें म्हणून तर तुमची आज किंमत आहे "

" तूं नसलीस तर काय कमी होणार माझं ? "

" लग्न होण्यापूर्वी—हे नारळ येण्यापूर्वी–कुऱ्याशिवाय दुसरं कोण विचारीत होतं आपल्याला ? "

" हे बघ तुझी बडबड नको आहे ऐकायला. कांहीं केलस तरी मी हा अस्साच येथें उभा रहाणार "

" मग मी देखील खुश्शाल तुम्हाला सोडून जाणार. "

" जा, अगदीं खुशाल जा, मी कुठं नको म्हणतोय् ? "

आणि ह्या संभाषणानंतर त्या ठिकाणीं भीषण शांतता पसरली. जवळपास कुठे सुई पडली असती तर तिचा देखील आवाज ऐकूं आला असता कोणालाही! जसजसा सूर्य खालीं जाऊं लागला तसतशी सावली लांब लांब जाऊं लागली. सूर्य अगदीं मावळण्याच्या सुमारास तर सावलीच माडापेक्षां मोठी झाली. सूर्य मावळतांच माडापासून दूर जातांना ती त्याला म्हणाली,

" बरं आहे. आतां बसा खुशाल रडत. मी उद्यां सकाळीं इथं येणार नाहीं हं. तुमचं आपलं तुम्ही पाहून घ्या. "

क्षणार्धांतच तेथून ती दृष्टी आड झाली.

विचारा माड ! एक शब्द देखील त्याच्या तोंडून त्यावेळीं बाहेर पडला नाहीं. हळूं हळूं अंधार आपलं साम्राज्य सगळीकडे पसरवूं लागला. निरनिराळे पक्षी निरनिराळ्या झाडांवरील आपल्या घरट्याकडे वळूं लागले आणि त्या तशा काळोखांत एकटा माड अगदीं निश्चल उभा होता. माणसा-

वर उपकार करण्यासाठीं आपल्या खांद्यावरील मडक्यांत सारा दिवस मिळविलेले अमृत तो थेंबाथेंबानें टाकीत होता. माणूस त्या अमृताचें काय बनवितो ह्याची त्या बिचाऱ्याला काय कल्पना? बाकी सगळीकडे भयाण शांतताच पसरली होती. तशा भयाण शांततेंत आपल्या आयुष्याच्या किती तरी रात्री त्यानें घालविल्या होत्या. परंतु आजची रात्र त्याला जाचक अशी वाटत होती. कारण उद्यां सकाळीं सांवली त्याच्याकडे परत येणार नव्हती. आतां दिवसभर आपल्या पायाशीं बसून आपलें रंजन कोण करणार म्हणून त्याला मोठी काळजी पडली होती. आतां त्याला वाटत होतें तिनें आपली सोबत केली म्हणून तर आपण इतका वेळ जगूं शकलों. तिच्या सान्निध्यांत प्रखर उन्हाचा देखील आपल्याला त्रास झाला नाहीं कधीं. पावसाळ्यांत चार महिने ती आपल्या माहेरी जाई त्यावेळीं त्याला विशेष कांहीं वाटत नसे; कारण त्यावेळीं स्वर्गामधील एक अतिशय देखणी......चंचल स्वभावाची नृत्यांगना सारी रात्र नृत्य करून त्याला दिवसभर श्रम करून आलेला शीण नाहींसा करून टाकीत असे. आतां तो विचार करीत होता, कीं सांवली आपल्यापासून दूर झाली. नंतर आपण जगणार कसे आणि कशासाठीं? हाच विचार त्याला भेडसावीत होता. इतक्यांत त्या स्वर्गीय नृत्यांगनेची—वीजेची त्याला आठवण झाली. तिच्या जवळ प्रेमयाचना करून तिलाच आपली सहचरी करावी. असें त्यानें मनाशीं ठरविलें. परंतु पुन्हां त्याच्यापुढें प्रश्न उभा राहिला. "आतां ही नृत्यांगना भेटणार तरी कशी आपल्याला?"

इतक्यांत वादळी वारा सुटला, "घों घों" करून तो, नृत्यांगना आकाशपटलावर येत असल्याची दवंडी पिटूं लागला. क्षणभरांत मुसळधार पाऊस कोसळूं लागला. आणि वाऱ्यानें माडाला वर्दी देतांच तो हर्षोत्फुल्ल झाला. मोठ—मोठ्यानें खदखदां हंसला. अवर्णनीय आनंद झाला त्याला......त्या आनंदाच्या भरांत तो वेडा वांकडा नाचला देखील. आपल्या खांद्यावरील तें मडकें त्यानें केव्हांच दूर फेंकून दिलें होतें. आणि आपल्या प्रियतमेच्या स्वागतार्थ पुन्हां तो मोठ्या उत्सुकतेनें उभा राहिला.

इतक्यांत आकाशांत " चमकन् " झालें—

तें पहातांच माड मोठ्यांदा हंसला– आणि हंसत त्यानें विजेला प्रश्न केला......

" कां सौदामिनीबाई... आज चुकून इकडं मोर्चा वळविलांत ? " पुन्हां " चमकन् " झालें आणि वरून उत्तर आलें...

" इंद्रसम्राटांच्या आज्ञेवरून आज एक खास बैठक आहे. "

बराच वेळ पर्यंत आकाशांत वीजेचा नृत्य समारंभ चालला होता. डोळ्याची पापणी लवूं न देतां त्यानें तो सारा प्रकार पाहिला. आणि सारें आटोपल्यानंतर रीतसर माडानें तिच्याजवळ प्रेम याचना केली, आणि कशी कोणास ठाऊक ? तिनें देखील त्याच्या म्हणण्याला चटकन् संमति दिली.

पहाटेच्या सुमारास मोठा थोरला " कडाड्कड " असा आवाज झाला आणि वीज माडाला आलिंगन देण्यासाठीं पृथ्वीवर आली. तिची व त्याची भेटा-भेट झाली. आणि काय आश्चर्य ! तो तिच्या मिठींतून आपली सुटका करून घेण्याचा प्रयत्न करूं लागला. तिची मिठी त्याला दाहक वाटली. तिनें आलिंगन देतांच कांटा उभा राहिला भीतीनें त्याच्या अंगावर ! कैक जणांना आलिंगन देण्यास सदैव तयार असणारी बाजारबसवीच ती ! तिटकारा आला माडाला. पण क्षणार्धांतच तो गतप्राण झाला. आणि त्या बाजारबसवीनें तेथून आपलें केव्हांच काळें केलें होतें.

*　　　*　　　*

सकाळ झाल्यानंतर रात्रभर भटकून सांवली त्या माडाकडे परतली. रागाच्या भरांत ती त्याला सोडून निघाली खरी, पण परिस्थिती कशी आहे ह्याचें निरिक्षण केल्यानंतर तिची खात्री झाली, कीं माडाला सोडण्यांत आपण मूर्खपणा केला. आणि पश्चात्ताप पावून ती त्या माडाकडे आली. पण तिचा माड होता कुठे तेथें ? त्याचें कलेवर तिचें स्वागत करण्यास उभें होतें.

थोडासा विचार केल्यानंतर सारा प्रकार तिच्या ध्यानामध्यें आला. कारण विजेविषयीं माडाच्या तोंडून तिनें अनेक प्रशंसापर उद्गार ऐकले होते.

आतां तिला पश्चात्ताप झाला. उगाच आपण टाकून बोललों त्याला, असें म्हणत ती स्वतःला दोष देऊं लागली. उगाच आपण त्याला "सोडण्याच्या" गप्पा मारल्या म्हणून ती स्वतःचीच निर्भत्सना करूं लागली. पण त्या साऱ्यांचा आतां काय उपयोग होणार, तें तिला ठाऊक होतें.

शेवटीं आपल्या प्रियकराचा, विजेनें असा घात केला म्हणून तिचा सूड घेण्याची सांवलीने प्रतिज्ञा केली. आणि पृथ्वी सोडून ती अंतराळांत गेली व विजेचा शोध करूं लागली. पण वीज पाहतांच तिची छाती धडधडूं लागली. शेवटीं दुसऱ्या कोणाकरवी तरी हिचा सूड घेतला पाहिजे म्हणून ती चंद्राकडे गेली. चंद्राजवळ जातांच चंद्राला ग्रहण लागले आणि त्यानें ह्या गोष्टीची आपली असमर्थता प्रगट केली. पुन्हां वेड्यासारखी सांवली भटकूं लागली. एके दिवशीं ती सूर्याकडे गेली, तों सूर्याला ग्रहण लागलें. आणि त्यानें देखील ह्या बाबतींत आपली असमर्थता प्रगट केली. आतां ह्या प्रतिज्ञेमुळें ती पुरी वेडी बनली. अजून देखील मधून मधून चंद्र-सूर्याला वीजेचा सूड उगवण्याविषयीं ती गळ घालते. मग पुन्हां पुन्हां चंद्रसूर्याला ग्रहण लागते. पण ह्या वेड्या सांवलीला कोण सांगणार कीं,

"तुझ्या प्रियकरासारख्या कैक जणांना त्या बाजारबसवीनें चंद्रसूर्यांच्या देखत जमीनदोस्त केलें आहे."



# चा
# ला पा
# पु या

" किती मजा वाटते नाहीं ? मला तर वाटतं, कीं हा पूल संपूच नाहीं !"

" खरं आहे, मला सुद्धां अगदीं तसंच वाटतं—! "

" पण पूल संपणार तर खात्रीनेंच— "

" त्या करतां एखादा उपाय शोधून काढावा "

" ही गाडीच येथें उभी करून ठेवावी— "

" नाहींतर ह्या खालच्या नदीचें पात्र तरी वाढवावें, असंच ना तुझं म्हणणं ? "

" पण मला किनई असं वाटतं, कीं दोन तीन तासपर्यंत ज्यावरून गाडी जाऊं शकेल असा एखादा पूल कुठं तरी उभारावा— "

" परंतु असा पूल उभारावयाची शक्यता तो समुद्रकिनाऱ्यावर बांधला तरच दिसते आहे मला. "

" हो ऽ हो समुद्रकिनाऱ्यानेंच जर असा पूल बांधला गेला तर किती बरं होईल ? ऐन वेळीं दगा देणाऱ्या त्या मेल्या बोटींची तरी तेवढ्यापुरती मनधरणी करायला नको— "

" पण त्यासाठीं किती माणसें-किती पैसा आणि किती काळ लागेल ह्याचा कांहीं विचार—? "

" किती कां पैसा आणि किती कां काळ लागेना ? परंतु पूल म्हणजे त्या देशाला भूषणच नव्हे कां ? "

" मग तसा पूल बांधण्याची शक्यता आपल्या देशांत होईपर्यंत आपण बहुतेक परलोक-निवासी होऊन देखील जाऊं— "

\+ \+ \+

# द्र ध
# इं ५८ नु

बडोद्याकडे जाणारी एक आगगाडी—

एका नदीवर बांधलेल्या पुलावरून झपाट्यानेंच चालली होती. तीव्र उन्हा-मुळें, किंवा कोंवळ्या किरणांमुळें डोळे दिपत नव्हते. त्यामुळें निसर्गाच्या कारा-गिरीचें मनमुराद नेत्रसुख घेतां येत होतें. आणि तसं पाहिलं तर धड दिवस देखील नव्हे व धड रात्र देखील नव्हे असा काल म्हणजेच संध्याकाळ नव्हे का ? म्हणून तर त्यावेळीं तसलं सुख अनुभवतां येतं. नव्या व जुन्या मतांचा असाच जर संगम झाला तर असलीच सुखाची परमावधी आपल्याला अनुभवतां येणार नाहीं काय ? साहजिकच असा विचार मनांत येत होता !

आजूबाजूला डोंगर व पिकलेली शेतें पसरलीं होतीं, मधूनच ती नदी संथ-पणें वहात होती. तिचा संथपणा नष्ट करायला तेथें लहानगी गलबतें नव्हती, कीं मोठाल्या बोटी नव्हत्या. त्यामुळें ती नदी मन मानेल तशी हांसत खेळत आणि बागडत होती. तीमधील लहान मोठे जीव पाण्यावर येत आणि लाग-लेच पाण्याखालीं बुडी मारीत. लहान मोठे जलचर आनंदानें स्वैर विहार करीत होते. त्यांच्या आंगचा तो नानारंग मिश्रित चकचकाट पाहून फारच मौज वाटत होती. मध्येंच एखादा मोठासा मासा लहान माशाला धरावयास जाई आणि तो लहान मासा जीव घेऊन पळ काढी. सत्तेसाठीं धडपड— पाण्यांतलि जगांत देखील चालू असत तर-? वरून एखादा पक्षांचा सुंदरसा कळप स्वैरसंचार करीत पळत जाई आणि त्यांच्यातलाच एखादा भाऊबंद मागें राही आणि मग तो पुन्हां परत पळत ओरडत जाऊन त्यांना मिसळे.

गाडीमधील एका खिडकींत—

सुधा बसली होती आणि समोरच्या जागेवर सुरेश बसला होता. आपल्या कथेची सुरवात, सुधा व सुरेश ह्यांच्या संभाषणानेंच झाली आहे. पुलावरून गाडी जात असतांना गाडींतील बहुतेक उतारू, नदीकडे कौतुकानें पहात होते. परंतु एकाच वेळीं सर्वांना नदीचें दर्शन होणें शक्यच नव्हतें. कारण गाडीला खिडक्या मोजक्याच असतात, तेव्हां कांहींना तर दर्शन घडण्याची

आशाच नसते. कांहींना इच्छाच नसते आणि कांहींना तर मुळीं जाग्यावरून उठण्याचाच कंटाळा येतो. तेव्हां बाकीचे लोक, त्या पुलाचें व नदीचें दर्शन घेऊन आनंदाचे आणि समाधानाचे सुस्कार सोडीत व पूल बांधणाऱ्या इंजिनिअरांना कोणी धन्यवाद देतात, तर कोणी सर्वसामर्थ्यवान इंग्रजांना दुवा देतात. तर कोणी, त्या नदीला दान धर्म करतात. एकंदरींत तो पूल पाहून सर्वांना उत्साह आणि मजा वाटत होती खास...! परंतु त्या तशा आनंदोत्सव प्रसंगींसुद्धां त्या पुलाकडे पाहून अश्रू गाळणारी एक व्यक्ति होती.

व्यवहारांतला एक साधासा प्रसंग ! ही व्यक्ति म्हणजे मजूर वर्गांतील एक वृद्धा होती, आणि त्या पूलाकडे पाहून तिचे डोळे फिरून फिरून भरून येत होते. सुरेश व सुधा ह्या दोघांच्याही मनांत तिच्याविषयीं कुतूहल उत्पन्न झाले आणि सुरेशच्यानें तर स्वस्थच बसवेना.

" सुधे— जा विचार तर खरं तिला— बाई कां रडतां म्हणून ? त्यामुळें सहानुभूतीचे कोणी तरी मिळाले ह्मणून आनंद होईल कदाचित् तिला— ! "

परंतु सुधेचा " विश्वासू मित्र " आळस—तिला सोडीत नव्हता.

" चला कांहीं तरीच—कशाला विचारायचं तें ? दिला असेल तिच्या मुलानें ह्या नदींत उडी टाकून जीव, आपल्याला काय करायचं आहे त्याच्याशीं ? एखादी लघुकथा लिहिण्यासाठीं विषय हवा वाटतं— ? " आणि खरंच सुधेचं बोलणं खरं ठरेल, कीं काय ह्याची सुरेशाला भीति पडली.

" असं कां ग अभद्र बोलतेस ? पहा तर खरं विचारून तिला. तुझें थोडंच त्यामुळें खर्च होणार आहे ?" सुरेशचें हळवें मन–तो तरी त्याला काय करणार !

" तुमचें हे असंच ! " आपल्या मित्राचा विरह सहन करणें सुधेला शेवटीं भाग पडलें आणि ती त्या वृद्धेच्या शेजारील बांकावर येऊन बसली.

" कुठं चाललां ? कशाला चाललां ? "

दोघांची मामुली प्रश्नोत्तरें झालीं, आणि असे प्रश्न आयुष्याच्या प्रवासांत एकजण दुसऱ्याला विचारीत नसतो सहसा, आणि बहुतेकजण तर स्वताला देखील

हे प्रश्न विचारीत नाहींत—म्हणून तर त्यांची स्थिति डोलकाठींविना फिरणाऱ्या जहाजासारखी होते. आणि मग सुधेनें मुख्य मुद्याला हात घातला—" आजी-बाई—ह्या नदीकडे पाहून तुमच्या डोळ्याला पाणीसं आलं ?" मग त्या आजीबाईनें आपली हकीगत सांगावयास सुरवात केली—शिवाय जुन्या माणसांना बोलते करावयास एखाद दुसऱ्या प्रश्नाची चावी वाजवीपेक्षां अधिक होते.

ती वृद्ध स्त्री पदरानें डोळे पुशीत सांगूं लागली.

" काय सांगू बाय ! बगा तीन वर्स झाली त्या गोष्टीला. माझा धाकला खंडु पांच महिने काम नव्हतं म्हणुनशानी घरीं होता—अन् बगा त्या वर्सी ह्या पूलाचा काम निघाला, खंडूचा बाप गांवचा लोहार व्हता तवां तो पन् तिकड ग्येला आन् त्याच्या संग मी खंडूलाबी न्याया सांगतलं. अन् आज बगा फुटक्या नशिबाची मी त्येला गमावूनशेनी बसले. पूल बांधनं दिसतं तितकं स्वाप नाय बाईसाब. ह्यो नदी किती खवाल ! अन् तिच्यामंदी लोखंडी खाम पुरायचे होतं—पन् त्येवी झालं—अन् बगा ह्या पट्या दिसतात न्हवं कां, तेवढ्याच मारा-यच्या—न्हायल्या व्हत्या. साह्यब नुसत येत आन् किती काम झालं ते बघूनश्यानी जात. अन् बघा आमच्यासारख्या गरिबाकडून ही असली जीवावरची काम करूनश्यानी घेत. तवा मी काय सांगितलं बगा माझा खंडू त्या पट्ट्यांची ठाकठोक करीत बसला होता, तवा सरकनी त्याचा पाय घसारला अन् ह्या राक्षसणीनं त्याला गिळूनश्यानी टाकला—त्यवापासनं बगा ह्यो पूल पहायला कां काय होत सांगू तुम्हाला !" हुंदके देत देत त्या वृद्धेनें आपली हकीगत संपविली. सुधेनें दाखविलेल्या सहानुभूतीमुळें तिला देखील थोडेसे बरें वाटलें. सुरेश जरी थोडासा दूर होता, तरी त्याला तें सर्व ऐकूं आलंच होतं. कांहीं वेळानें सुधा आपल्या जाग्यावर येऊन बसली—तरी सुरेश एकाग्रतेनें कसला तरी विचार करीत होता.

" ऐकलं कां, म्हटल त्या म्हातारीचा मुलगा तो पूल बांधला जात असतां नदींत पडून मेला— "

सुधा तिसऱ्या कोणाला ऐकूं न जाईल इतक्या आवाजांत म्हणाली–तरीसुद्धां सुरेश जागचा हालला नाहीं, कीं त्याचे तोंड उघडले नाहीं—आणि विचार करण्यासारखी एखादी गोष्ट डोळयांसमोर आल्यानंतर ती संबंधींचे विचार डोक्यांत उद्भवतात आणि चालूं व्यवहारांत कान आपलें काम करण्यात कसूर करतात असंच होत नाहीं का प्रत्येकाचें—!

" म्हटलं कसली एवढी समाधी लागलीय ? "

इंजिनकडून आंगावर उडालेला कोळसा झाडीत सुधा म्हणाली.

" काय म्हटलंस ? "

सुरेश समाधींतून जागा झाला. परंतु त्याची समाधी किती तरी वर्षांची होती असं सुधेला वाटलं.

" कोणत्या देवतेसाठीं—? "

सुधेनें मुद्दामच खिजविलें.

" समोर बसलेल्या देवतेच्या प्रक्षोभ शांत्यर्थ —! " सुरेशनें चांगलीच संधि साधली.

" इश्य, थट्टा नाहीं. पण खरंच विचारते एवढा कसला विचार चालला होता ?" सकाळींच डोक्यांत घातलेली गुलाबाची कळी सारखी बसवीत सुधा म्हणाली.

" विचार—विचार करीत होतों त्या पुलासंबंधीचा. " खिडकी बाहेर पहात सुरेश म्हणाला.

" हात्तिच्या, पण विचार करण्याजोगं एवढं आहे तरी काय त्यांत ? " अर्धवट हंसत सुधेनें प्रश्न केला.

" विचार करण्याजोगं— विचारसरण्याजोगं त्यांत पुष्कळच आहे समजलीस. त्या वृद्ध बाईच्या एकंदर हकीकतीवरून माझ्या डोक्यांत चांगला प्रकाश पडला आहे, कीं ज्या गोष्टीचा उपयोग आम्हीं अगदीं सहजपणें व हक्कानें घेतो, त्यांचा नुसता पाया घालण्याला किती काल—किती द्रव्य आणि किती जीव खर्ची पडतात ह्याचा आह्मी मुळीं कधीं विचारच करीत नसतो. सुधे, नुसता साधा आपण रोज पोटांत ढकलतो तो भातच घेना!

तांदूळ दिसायला अगदीं साधे आणि विकत घ्यायला अगदीं स्वस्त, पण त्या संबंधीं ते शिजवून खाण्यापलीकडे, आपण कांहीं विचार करतो कां? ते तांदूळ तयार करण्याकरतां त्या शेतकऱ्याला थंडी वाऱ्यांतून किती काल आणि किती श्रम करावे लागले असतील ह्याचा नुसता विचार तरी आपल्या डोक्यांत चमकून जातो काय? पैसे दिले, वस्तू विकत घेतली, कीं झालों आम्ही मोकळे. स्वताच्या देशबांधवांच्या सुखाचा विचार करावयाचा ह्मणजेच स्वताच्या सुखाचा विचार करावयाचा हे साधें तत्व देखील आह्मांला कळत नाहीं."

"इश्श कांहीं तरीच! स्वताच्या सुखाचा विचार प्रत्येकजण अगदीं पूर्णपणें करीत असतो, समजलं कां?"

"तें सुख निराळं आणि दुसऱ्याच्या—ह्मणजेच देशबांधवाच्या अथवा समाजाच्या सुखांत व्यापक दृष्टीनें आपलं सुख पहाणं निराळं—सुधे स्वताच्या सुखाबरोबर आह्मी जर दुसऱ्याच्या सुखाचा देखील विचार करीत आलों असतो— तर—तऽर? तूंच विचार कर, कीं तो तेवढासा पूल बांधतांना किती खंडू बळी पडतील ह्याचा नुसता विचार तरी आला कां डोक्यांत?" सुरेश आतां ह्यापुढें आणखी एखादे देशभक्तीवर व्याख्यान झोडणार, कीं काय याची सुधेला काळजी पडली.

"इश्श, पण मी ती थट्टाच केली होती मुळीं!" सुधा हंसतच म्हणाली—

"होय कबूल कीं तें तू थट्टेनेच म्हणालीस. परंतु थट्टा करतांना तरी तुझ्या डोक्यांत अशा खंडूसंबंधीचा विचार आला होता काय?" सुरेश शांतपणें म्हणाला.

"एकूण तुमचं म्हणणं काय, कधीं कधीं पूल उभारतांना खंडूसारख्यांच्या बलीदानाचा पाया घालावा लागतो आणि त्याचा आपण मुळीसुद्धां विचार करीत नाहीं, असेंच ना?" सुधा देखील शांतपणेंच म्हणाली.

"होय—!" सुरेशनें उत्तर दिलें.

# हृदय-पालट

बंधाऱ्यानें अडवून धरलेलें पाणी बंधारा नाहींसा होतांच ज्याप्रमाणें मिळेल त्या मार्गानें धावूं लागतें, त्याप्रमाणेंच मुंबईच्या चाळीसहजार गिरणी कामगारांनीं संप पुकारल्याची बातमी बाहेरगांवीं जो इसम भेटेल त्याला कवटाळीत होती.

आणि सोलापुरांत ती बातमी येऊन पोंचतांच, त्या बातमीच्या आगमनानें जर कोणाला अस्वस्थ करून टाकलें असेल तर तें गिरणी मालकांनाच ! कारण दररोज नवीन नवीन बातम्या येत होत्या. "आज कुर्ल्याचे गिरणीकामगार संपांत दाखल झाले" "अहमदाबादच्या मजुरांनीं आपली संपाला सहानुभूति दिली." अशा प्रकारची एकेक बातमी गिरणीमालकांना धरणीकंपाच्या धक्क्याप्रमाणेंच वाटत होती. परंतु सोलापुरच्या "चंद्रप्रभा" मिलसच्या मालकांना ह्या संपाची तितकीशी फिकीर वाटत नव्हती, असें दिसत होतें; आणि त्याचें कारण देखील तसेंच होतें. गिरणीचे मॅनेजरचें काम दिनेश—म्हणजे मालकाचा मुलगाच स्वतः पहात असे. त्यामुळें त्यांच्या गिरणींत अंदाधुंदीचें नांवच नव्हतें. तरीपण संपाची बातमी त्याच्या कानावर पडतांच ह्या मुंबईच्या संपाचे परिणाम कोणाकोणाला भोगावे लागतील, ह्या सर्वांचा त्याला डोकें खाजवून विचार करावा लागला; आणि शेवटीं सोलापुरांत बसून कांहीं जेव्हां ह्याची त्याला कल्पना येईना तेव्हां दिनेश आपल्या वडिलांच्या अनुमतीनें संपाची परिस्थिति डोळयानें पहाण्याकरितां "जातीनें"च मुंबईंत हजर झाला.

"कल्पलताश्रम" नांवाच्याच लॉजिंग आणि बोर्डींगमध्येंच त्यानें आपलें बिऱ्हाड थाटलें. सकाळीं आठ वाजतां उठावयाचें, चहा घ्यावयाचा, दुपारपर्यंत सारीं वर्तमानपत्रें झाडून वाचून काढावयाचीं आणि नंतर जेवून गिरणीच्या भागांत एक खेप घालायची आणि संध्याकाळीं तिकडून आल्यानंतर चहाचा एखादा डोस मारून परत फिरायला जावयाचें आणि रात्रीं सारा "पत्रव्यवहार"

लिहावयास घ्यावयाचा हा दिनेशचा रोजचा क्रम, आणि त्या पत्रव्यवहाराकरतां मग रात्रीं दोन दोन वाजेपर्यंत त्याला जागावें लागे. कारण, मिल् मॅनेजिंगच्या सर्व सूचना, आपल्या साथीदारांना तो येथूनच पाठवीत होता.

आणि अशाच दोनतीन रात्रीं कामासाठीं दिनेशला जागून काढाव्या लागल्या म्हणून आज संध्याकाळीं कुठेंतरी लांब फिरायला जाण्याचें त्यानें ठरविलें. आश्र-मांतून असें ठरवून निघाला खरा--परंतु रस्त्यावर येऊन ठेपल्यावर निश्चित कुठें जावयाचें, ह्याचा त्यालाच ठाम निश्चय करतां येईना. चौपाटीवर जाण्यासाठीं त्याचे पाय वळले--परंतु ती येथील गर्दी त्याच्या डोक्यांत येतांच त्यानें आपला बेत रहित केला. मग जावयाचें तरी कुठें ? ह्या प्रश्नाशीं डोक्यानें त्याला युद्ध करावें लागलें आणि नंतर त्याच्या डोक्यांत काय आलें कोणास ठाऊक ? म्युझियमकडे जाणारी एक ट्रॅम आली आणि दिनेश सरळ तीमध्यें चढला.

" अपोलो बंदरची हवा तर खाऊंया आज ! गेट् वे मध्यें उभं राहून तरी घेऊं या थोडा वेळ !"

त्यानें मनाशींच म्हटलें आणि कंडक्टरजवळ एक म्युझिअमचें तिकिट मागितलें.

ट्रॅममध्यें आजूबाजूला दिनेशनें दृष्टी फेकली. त्याच्या बांकावर शेजारींच एक वीस पंचविशीच्या आंतील सूटाबुटांत एक तरुण बसला होता. दिनेशच्या हाताच्या कोपराचा जरासा धक्का लागतांच त्यानें आपल्या कोटाची तेथील इस्तरी परत सारखी केली. रस्त्यावरून जाणाऱ्या एका भिकाऱ्यानें खिडकींतून त्या तरुणापुढें आपला हात पसरला--तों १७६० आठ्यांचें जाळें पडलें त्या तरुणाच्या कपाळावर ! दिनेशला राग आला त्याच्या ह्या वर्तणुकीचा—पण निरुपायानें तो स्वत:शींच म्हणाला—

" स्वतःच्या छानछोकीपलीकडे जगांत आपल्याला दुसरे कोणते कर्तव्य आहे ह्याचा विचार कधीं शिवायचा नाहीं, बेट्यांच्या मनाला ! गरीबांना अन्नासाठीं

आपलीं पोटं तळमळत ठेवावीं लागत आहेत, ह्याचा विचार जणूं काय आपला नाहींच !" त्या तरुणाच्या शेजारीं बसण्याचा अगदीं कंटाळा आला दिनेशला. केव्हां एकदां आपणां दोघांपैकीं एकजण उठतोय असें होऊन गेलें त्याला. शेवटीं एकदांचा "कॅपिटॉल" सिनेमा आला आणि तो त्याच्या शेजारचा तरुण उतरण्याकरितां उठला. दिनेशनें एक उसासा टाकला. त्याला बरेंच हायसें वाटलें. "फिल्म तरी काय लागलीय एवढी कॅपिटॉलला ?" असें म्हणत त्यानें खिडकीबाहेर नजर टाकली तोंच फिल्मचें नांव "वंडर बार" आणि नृत्य आणि मदिरा ह्याचींच सगळीकडे चित्रें लावलेलीं त्याला दिसलीं. "वा ! काय टेस्ट आहे !" दिनेश स्वतःशींच म्हणाला आणि कालच लिहिलेल्या लेखांतील दोनतीन वाक्यें त्याला आठवलीं.

"आमच्या समाजाचें दुर्दैव संपलें असें तरी कोणी कोणत्या तोंडानें म्हणावें? आमची आजची तरुण पिढी सिनेमा आणि नाटक ह्यांत इतकी रंगून गेली आहे कीं "सामाजिक अन्याय" तिला नाटक—सिनेमांतून पहाण्यास मौज वाटत आहे. व्यवहारांतील सामाजिक अन्यायांविरुद्ध "ब्र" काढावयास किंवा तो अन्याय दूर करावयास कोणताच तरुण पुढें येऊं इच्छित नाहीं."

एकदांचें म्युझिअम आलें आणि सर्व ट्रॅम रिकामी झाली तरी देखील दिनेश उठला नाहीं. शेवटीं जेव्हां कंडक्टर ओरडला "नीछे उतर जाव—अब गाडी कालबादेवी जायगी" त्या वेळीं दिनेश आपल्या विचारांतून जागा झाला आणि खालीं उतरला. समोरच्या एका रस्त्यानें तो सरळ "गेट्वे" जवळ आला आणि गार वारा खात तो तेथेंच उभा राहिला. उष्ण हवेंतून तेथें आल्यामुळें त्याला जरा बरें वाटलें. फिरत फिरत ती इमारत तो न्याहाळूं लागला आणि स्वतःच्या मनाला तो प्रश्न करूं लागला "ह्या इमारतीला काय खर्च आला असेल ? त्या तेवढ्या पैशांत कितीजण पोटाला लागले असते ? ह्या इमारतीचा गरीबानांच काय परंतु श्रीमंतांना तरी किती उपयोग होत आहे ?" आणि अशा प्रकारचे प्रश्न त्याच्या डोक्यांत थैमान घालूं

लागले. असे त्याचे विचार चालूं असतांनाच " गेट्वे " च्या पुढील बाजूला कांहीं गडबड चाललेली त्याला आढळली—म्हणून तो तेथें जाऊन उभा राहिला, त्यानें तेथें पाहिलें तों बी. एस. एन्. कंपनीची एक " प्लेझर क्रूझ " डफरीनला फेरी मारून येण्यास निघालेली आणि एकेक रुपया टाकून लोक तिचीं तिकीटें खरेदी करीत होते.

एक मोठ्या पोटाचा गुजराथी बनिया कोणा एका दक्षिणी पद्धतीचे कपडे घातलेल्या बाईबरोबर आला होता आणि तो " क्रूझच्या " दोनचार रिझर्व्ह सीटचें तिकीट काढण्यांत गुंतला होता. आणि ते अशा प्रकारचे " गुजराथी–दक्षिणी " जोडपें पाहून तेथें जवळपास उभीं असलेलीं आजूबाजूचीं लोकं अनेक तऱ्हेनें कुजबुजत होतीं. प्रत्येक जण मारे अगदीं " ॲथॉरीटीनें " सांगत होता, कीं ती बाई त्याची 'रखेली' आहे. आणि " तसें असेल देखील कदाचित " म्हणून दिनेशनें तिकडे लक्ष दिलें नाहीं. तिकीट-ऑफिसभोंवती बरीचशी गर्दी पाहून दिनेशला काय वाटलें कोणास ठाऊक? त्या गर्दीतून त्यानें तिकीटाच्या खिडकीजवळ वाट काढली आणि एक रुपया टाकून " प्लेझर क्रूझ " चें एक तिकीट खरेदी केलें आणि " न्याय करील देवराय भाव पाहतां " ची लकेर मारीत तो त्या " क्रूझ " मध्यें एक मोकळीशी जागा पाहून बसला. एका टोंकालाच शांत आणि हवाशीर अशी ती त्याची जागा होती– आणि त्याच्या समोरच्या टोंकालाच त्या " दाक्षिणी गुजराथ्यां "ची रिझर्व्ह जागा होती.

वेळ होतांच बँडच्या मंजूळ स्वरांत त्याची बोट चालू झाली. बँडच्या सुराला आपल्या पायांमधील बुटानें तो साथ देत होता. एक गाणें संपलें आणि विश्रांतिकरितां बँड थोडा वेळ थांबला. हा वेळ पावेतों बोटीनें बंदरापासून बरेंच अंतर काढलें होतें. दूरवर दिसणाऱ्या " हिंदुस्थानच्या प्रवेशद्वाराकडे " तो कौतुकानें नजर फेंकीत होता. इतक्यांत त्याच्या दोघां शेजाऱ्यांचा संवाद त्याच्या कानावर आला.

" तो पाहिलास कां रे ढेरपोट्या बनिया ? " एक रंगेल सुशिक्षित दक्षिणी दुसऱ्याला म्हणाला.

" हो-केव्हांच पाहिला-अं पाहिला कसला ? अरे त्याच्या बरोबरच्या सुंदर वस्तूंकडे पहातांना तो दिसला इतकंच-नाहीं तर पहाण्यासारखं काय आहे त्याच्यांत ? "

त्याचा मित्र सवाईच दिसला.

" ती त्याच्या बरोबरची कोण आहे-माहित आहे तुला ? "

" कोण ! अरे गुजराथ्याबरोबर दक्षिणी कोण असतें हें न समजण्याइतका मी काय दुधखुळा आहे ? "

" अरे पण ती कोण आहे-असं वाटतं तुला ? "

" त्या बाईच्या हातांत एका श्रीमंत नंदीबैलाचे लगाम आहेत असं मला वाटतं ! "

" पण पूर्वी ती कोण होती ? "

" ऋषीची कुळं शोधायची नसतात ! "

" तरीपण ? "

" माहित नाहीं बुवा ! "

" मग मी सांगतो ऐक. अरे पूर्वी ती एका खलाशाची बायको होती. "

" मग ह्या पेशांत ती कशी रे येऊन पडली ? "

" तेंच तर मी सांगणार आहे-ऐक-तें असं झालं बघ. हिचा नवरा होता खलाशी; तेव्हां बिचारा वर्षातून मोजकेच दिवस घरीं असायचा "

त्या दोघा शेजाऱ्यांचें चाललेलें हें संभाषण दिनेशला जरा ऐकावेसें वाटलें म्हणून तो लक्षपूर्वक ऐकूं लागला.

" बरं पुढें ?" दुसरा पहिल्याला म्हणाला.

" तो बाहेर असायचा आणि ही घरांत एकटीच असायची—त्या वेळचं हिचं नांव बघ हं—शेवंतीच होतं—तिच्या गांवकऱ्यांनींच मला ही हकीगत

सांगितली. बिचारी काम करून कंटाळायची आणि इकडे हा तिचा नवरा बोटीच्या लांबलांब सफरी मारायचा आणि "कराची—मुंबई–कोलंबो–मद्रास–कलकत्ता" सारखी बडी बडी शहरं पहायचा आणि अर्थातच त्यांचं पाणी चाखायाचा ! त्याच्या मनाला वाटलंच तर पगारांतले थोडेसे पैसे शेवंतीकडे पाठवायचा—नाहीं तर नाहींच. त्यामुळें इकडे तिचे हाल होऊं लागले त्याची कल्पना पण नव्हती त्याला. मग बिचारी स्वतःच्या पोटासाठीं दुसऱ्याची मोलमजुरी करायची. अगदीं स्वताच्या हाडाची जेव्हां कुठं काडं करायची तेव्हां कुठं तिचं पोट भरायचं. परंतु असं किती दिवस चालणार ? ती दुसऱ्यांची मोलमजुरी, भांडींधुणीं वगैरे करीत होती. त्यावरून तिच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना कळून चुकलेंच, कीं हिच्या नवऱ्याचें कांहीं हिच्याकडे विशेष लक्ष नाहीं आणि कावळ्यांत डोमकावळे असतात—गांवांत महारवाडा असतोच. तिच्या एका शेजाऱ्यानें तिला एक दिवशीं चांगलीच फसवली "तुला तुझ्या नवऱ्याकडे नेतों" असें सांगून त्यानें तिला मुंबईला आणली व एका व्यापाऱ्याला विकली आणि त्या व्यापाऱ्यानें तिला एका कुंटणखान्यांत नेऊन सोडली. त्यानंतर कांहीं महिन्यांनीं असं ह्मणतात, कीं तिच्या नवऱ्यानें पत्ता काढीतकाढीत त्या कुंटणखान्यांत तिची भेट घेतली आणि विचारलें "तुला माझ्याबरोबर रहायचे आहे कां ?" त्या वेळीं तिनें त्याला चोख सांगितलें, कीं मला "ह्याच धंद्यांत अधिक बरे वाटते !" निरुपायानें त्यानें तिचा नाद सोडला–त्या गांवचें तें झोंपडं त्यानें विकलें आणि त्या गांवाला त्यानें अजिबात रामराम ठोकला."

प्लेझर क्रूइझनें डफरिनला वळसा घालून परत "गेटवे" गांठला तरी दिनेश त्याच्या ह्या शेजाऱ्याच्या गोष्टींतच रमून गेला होता–गोष्ट कसली, ती एक सत्यकथाच होती. बोट धक्याला लागली–शिडी टाकण्यांत आली आणि दिनेश सरळ धक्यावर उतरला–उतरला तो देखील एखाद्या यंत्राप्रमाणेंच ! त्याच्या डोक्यांत कोणत्या तरी विचारानें अगदीं थैमान मांडलें होतें–ट्रॅमच्या रेलवर तो आला—"आपण येथें कसें आलों ?" हें देखील त्याला कळलें

नाहीं. गिरगांवकडे जाणारी एक ट्रॅम ठणठणत आली तेव्हांकुठें तो शुद्धीवर आला. मग ताजेंतवानें होण्याकरितां त्यानें एक कप चहा घशांत ओतला—खिशांतील एक आणा कॅशरच्या काउंटरवर फेंकून धांवतच त्यानें काळबादेवी-कडे जाणारी ट्रॅम गांठली.

बोटींत दिसलेली ती शेवंती—आणि कानावर पडलेली तिची माहिती—ह्यावरच दिनेश कितीतरी विचार करीत होता. आतां संप थंडावला होता, म्हणून अलीकडे तो परळला जात नव्हता. दुपारीं तो आतां पत्रव्यवहार करूं लागला होता. आज सहा वाजतांच त्याचें सारें काम आटोपलें आणि चहाचा "डोस" मारण्याकरितां तो "हॉटेल"मध्यें जाण्यासाठीं खालीं उतरला; इतक्यांत त्याच्या समोरून एक "गुजराथी—दक्षिणी" जोडपं अस-लेली मोटार गेली. त्यांतला बुवा त्याला अनोळखी वाटला—पण ती बाई त्याला कुठेंतरी पाहिल्यासारखी वाटली. "हो— ती बोटींमधील शेवंतीच !" आतां त्याला तिची पक्की ओळख आठवली म्हणून वेगांत दूरवर जाणाऱ्या मोटा-रकडे तो न्याहाळून पाहूं लागला—इतक्यांत एक वेडसर— मळकट पोषाख केलेला एक गृहस्थ, त्यानें त्या मोटारमागें धांवतांना पाहिला—पण त्यानें त्या गृह-स्थाला पुरतेपणीं पाहिलें असेल अगर नसेल—इतक्यांत एक "B. E. S. T." ची बस आली आणि तिनें त्या गृहस्थाला धक्का दिला—पडतांना त्या गृहस्थानें "शेवंती—ए शेवंती" अशी मारलेली आरोळी मात्र दिनेशच्या कानावर पडली; उत्सुकतेनें दिनेश त्या ठिकाणीं गेला. तो गृहस्थ म्हणजे शेवंतीचा नवरा होता—कारण तसें त्या गृहस्थानें तोंडानेंच सांगितलें. जबर दुखापत झाली होती त्याला ! पोलीस आले आणि त्याला मोटारमध्यें घालून जी. टी. हॉस्पिटलकडे रवाना झाले.

दोन दिवसांनीच "टाइम्स"मध्यें दिनेशनें तो शेवंतीचा नवरा परलोकवासी झाल्याचें वाचलें—त्यावेळीं त्याच्या डोक्यांत विचार आले—

"शेवंतीचा नवरा तिच्यापासून दूर कां होता ?"

" पोटाची भूक शमविण्यासाठीं !"

" शेवंती शेजाऱ्याबरोबर मुंबईला कां आली ? "

" नवरा भेटण्याची आशा करून—पोटांतील भूक शमविण्यासाठीं ! "

" शेवंतीनें नवरा भेटल्यानंतर त्याबरोबर रहाण्याचें कां नाकारलें ? "

" तो प्रथम तिच्या पोटाची भूक शमवूं शकला नाहीं म्हणून ?"

" शेवंतीचा नवरा इतकें करून मोटारमध्यें जाणाऱ्या तिला कां भेटूं इच्छित होता ? "

" पोटाची भूक पूर्णपणें शमल्यावर—हृदयाची भूक शमविण्याकरितां ! "

" मिळून काय ? " दिनेशनें विचाराचा शेवट केला " साऱ्या अनर्थांचे मूळ पोटांतील भूक ! "

\+ + +

कांहीं दिवसांनी दिनेश सोलापुरला गेला—

आणि थोडक्याच दिवसांत " चंद्रप्रभा " मिल्सच्या अधिकारीवर्गांच्या पगारांत साडेसात टक्के कपात—

आणि कामगारांच्या पगारांत पंधरा टक्के वाढ झालेली सर्वांना आढळून आली—!

परंतु दिनेशमध्यें हा हृदय पालट कसा झाला तें कोणालाच समजलें नाहीं.



# ❀ बेइमान ❀

दिलेलें काम मोठ्या हौसेनें पत्करावयाचें आणि तें काम करण्यांत तत्परता दाखवून आपल्या धन्याला खूष करावयाचें, अशा प्रकारें वागण्यांतच त्याचें सारें आयुष्य गेलें होतें. धन्यानें कितीही कंटाळवाणें काम दिलें तरी त्याबद्दल त्यानें कधीं कुरकुर केली नव्हती, कामाबद्दल जी मिळेल ती भाकरी खाऊन तो नेहमीं समाधान वृत्तीनें रहात असे. मग धन्यानें त्याचे लाड केले अथवा तो त्याच्यावर खूष असला तर त्यांत नवल काय ?

दिवसाच्या बारा तासांत सहा तास तो झोंप काढीत असे आणि रात्रीं तो आपल्या कामाला सुरवात करी. डोळयांत तेल घालून जागता पहारा करण्याचें त्याचें काम...पण मधून मधून तो डुलकी घेत असेच. जरा कुठें खुट्ट झालें, कीं त्याबद्दल आजूबाजूच्या सर्वांना इशारा द्यावयाचा हा त्याचा रोजचा आयुष्यक्रम !

तसं पाह्यलं, तर दिवसा त्याला कोणी सांखळीनें बांधून ठेवीत नसे...... रात्रींच काय तें त्याला बंदिस्त करण्यांत येई. पण मोकळा असतांना आपल्या स्वातंत्र्याचा कधीं त्यानें दुरुपयोग केला नाहीं. स्वातंत्र्य मिळतांच आपल्या जातभाईप्रमाणें त्यानें आपलें तोंड घाणीकडे कधीं वळविलें नाहीं अथवा झोंप काढून ठरलेला वेळ, गांवामधील नसत्या उठाठेवी करण्यांत कधींच खर्च केला नाहीं अथवा झोंप काढून जणूं काय, एखाद्या बैराग्याप्रमाणें तो आपल्या आयुष्याचें महत्व जाणून होता. गडबड...धडपड...केलीच, तर ती सारी तो घरामध्येंच करीत असे. त्याच्या धन्याचा मुलगा कधीं " मोत्या—मोत्या " करीत त्याच्यापुढें चेंडू टाकीत असे. मग तो चेंडू इक-डून तिकडे गडगडत जाऊं लागला, कीं त्यांत त्याचा अर्धा पाऊण तास सहज निघून जात असे. कधीं कधीं शेजार पाजारच्या मांजरांजवळ तो हमरीतुमरीवर येत असे. पण क्वचितच तें !

धन्याचा तो आवडता असल्यामुळें, त्याला त्याच्या बरोबर फिरायला जाव-यास देखील मिळे. त्यावेळीं त्याच्या मानेभोंवतीं जरी सांखळी अडकविलेली असे, तरी त्याची त्याला फिकीर वाटत नसे. त्याच्या त्या पारतंत्र्याकडे पाहून रस्त्यावरील त्याचे जातभाई त्याची हेटाळणी करीत...परंतु तो कोणाचीच पर्वा करीत नसे...आपल्या धन्याबरोबर ऐटीनें चालण्यामध्येंच तो भूषण मानी.

घरामधून बाहेर पडतांना शेजारच्या बंगल्यामधील एका दरवाजाकडे मात्र तो एकवार नजर फेंकी आणि तेथें त्याला त्याची प्रिय वस्तू दिसली, कीं छाती काढूनच तो आपल्या धन्याच्या पुढें चालूं लागे. आणि ती प्रिय वस्तू तेथें त्याला आढळली नाहीं, कीं मग मात्र त्याचा सारा उत्साह पार मावळून जाई. आज बरेच दिवस त्या शेजारच्या चंपीची तो मैत्री संपादण्याचा प्रयत्न करीत होता. पण त्याच्या प्रयत्नाला अजून यश आलें नव्हतें, कारण ती चंपीच मुळीं ह्याच्याशीं दोस्ती करायला तयार नव्हती, कीं काय कोणास ठाऊक ? आणि खरें म्हटलें तर तिनें तरी ह्याच्याबरोबर काय म्हणून दोस्ती करावी ? कां हा आपलें घर सोडून कधीं तिच्याजवळ गेला होता......कां इतरांप्रमाणें ह्यानें तिला कधीं खूष करण्याचा प्रयत्न केला होता...? पण त्याला आपल्या मनांतून खूप वाटत असे, कीं तीच आपली मैत्रीण व्हावी. आणि आपण कांहीं तरी पराक्रम करूनच तिची मैत्री संपादन करणार अशी त्याची महत्वाकांक्षा......! आतां कोणता पराक्रम करावा ह्याबद्दलच तो इतके दिवस विचार करीत होता.

ध्यानींमनीं नसतांना मात्र, एक दिवस त्याला चांगलीच संधि लाभली. नेहमीच्या संवयीप्रमाणें दुपारीं मोकळा असतांना तो कठड्याजवळ आला व त्यामध्यें तोंड घालून त्यानें चंपीच्या दरवाजाकडे नजर फेंकली.

कांहीं लहान लहान मुलें सांखळीनें बांधलेल्या चंपीला मारीत आहेत...... असें दृश्य त्याच्या दृष्टीस पडलें.

मग काय, चारी पायावर उड्या टाकीतच तो त्या बाजूला धांवत गेला...... आणि दोन चार वेळा " भूं...भूं " करून, त्यांतल्या एका पोराच्या पायाचा त्यानें चावा घेतला. त्यानें पायाचा चावा घेतांच तें पोर मोठ्यानें रडत......

ओरडतच आपल्या घराकडे पळालें......आणि त्याच्याबरोबर त्याचे सारे दोस्तही तेथून पसार झाले.

आणि एकटा मोत्या मोठ्या अभिमानानें चंपीकडे पाहूं लागला, तों ती तिरस्कारानें त्याच्याकडे पहात होती; जणूं काय तिचे डोळे त्याला सांगत होते.

" काय गरज तुला इथें तोंड घालायची...निलाजरा मेला...आणि त्या पोराला चावायची तुला काय गरज...? कां मला तोंड नाहीं चावायला...... चांगली मी त्या पोरांशीं खेळत होते...तर आला मेला लाळ घोटायला इथं...! आणि आतां तुझ्या ह्या करणीबद्दल मला बाहेर हांकललं तर..."

आणि तो केविलवाणें तोंड करून तिला सुचवीत होता...

" तुला जर तुझ्या मालकानं हाकललं, तर मी माझ्या मालकाचं घर सोडीन, आणि मग आपण दोघे जणं कुठं तरी एके ठिकाणीं राहूं... "

परंतु चंपी त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून, त्याच्याकडे पाठ फिरवून अश्रूपूर्ण नयनांनीं त्या मुलाकडेच पहात राहिली होती...

" काय बेइमान आहे पहा. हिच्या सुखासाठीं मी इतका त्याग करावयास तयार झालों, तरी हिला त्याचें कांहींच नाहीं...कांहीं नाहीं ही मनुष्यजात किती जणांच्या सुखांत विष कालवील हें ब्रह्मदेवाला सांगतां यावयाचें नाहीं..."

इतक्यांत ज्या मुलाला मोत्या चावला होता, त्याला घेऊन त्याची आई तेथें आली आणि बरीच माणसें तेथें जमली...मग मोत्या रहातो कशाला तेथें...? तो मुलगा ओरडतच होता. आजूबाजूची मंडळी चंपी चावली, कीं इतर कोणता कुत्रा चावला ह्याची शहानिशा करून घेत होती.

इतक्या वेळांत मोत्या मात्र आपल्या घरीं येऊन आपल्या नेहमींच्या जागेवर बसला होता. आणि आपल्या मनाशीं म्हणत होता.

" ह्या चंपीसाठीं मी एवढा स्वार्थत्याग करावयास निघालों पण तिला त्याचें कांहींच नाहीं. अगदीं बेइमान आहे. बेइमान......!"



---